संगीत

# सत्यविजयनाटक.

हें

पुस्तक

## माधव नारायण पाटणकर,

(पाटणकर संगीत मंडळीचे म्यानेजर
व मालक)

यांनीं रचिलें.




तें

मुंबईंत

'बॉम्बे न्यू प्रेस' मध्यें छापून

प्रसिद्ध केलें.

---

आवृत्ति २ री.

---

सन १८९९

---

किंमत १ रुपया.

हें

पुस्तक,

मुंबापूरवासी रसिक, विद्वान्, गुणग्राही,

प्रियबंधु व आर्यभगिनी यांस,

त्यांची उदारता, प्रेम व नाट्य-

कलेविषयीं आस्था इत्या-

द्यनेक गुणांचें स्मरणार्थ

कर्त्यानें अति न-

म्रतेनें अर्पण

केलें असे.

**मा० ना० पाटणकर.**

पुस्तककर्ता.

श्री.

# संगीत सत्यविजय नाटक.

## अंक १ ला.

### मंगलाचरण.

पद. ( राग–भूप, ताल–त्रिवट. )

श्रीजगदीशा प्रथम नमोनी ॥ समर्पितों सुमनांजलि चरणीं ॥ धृ० ॥ नानापरिचीं रूपें धरूनी ॥ सूत्रधार बनला जो त्रयभुवनीं ॥ माया नटीतें वेष देऊनी ॥ अघटित नाटक-रचना करुनी ॥ खेळ करी जो विश्वरंगणीं ॥ १ ॥ अचेतना चैतन्य देउनी ॥ नाचवि पात्रें सूत्रें घेउनी ॥ षड्ऋतु-चक्रा गति देऊनी ॥ तोषवि सकलांसी दिन-रजनीं ॥ २ ॥

पद. ( गुरु दत्त निरंजन० या चालीवर. )

गुरुदत्त दिगंबर भजरे ॥ त्रैमूर्ति अत्रितनयारे ॥ धृ० ॥ पायिं खडावा कटीं मेखला

दंड कमंडलु माला ॥ शंखशूल षट्करीं
धरी जो चक्र विमलकमलाला ॥ १ ॥
नाम-सुधातव मोचन करिते अखिल मुमुक्षू-
जनवृंदा ॥ श्रीपादश्रीवल्लभ नरहरी सद्गुरु
चरणा वंदा ॥ २ ॥

**सूत्रधार**—मित्रहो, झालें इतकें ईशस्तवन पुरे आहे. आतां तुह्मीं आपआपल्या कामाच्या वेषाची तयारी करण्याकरितां जा. आर्ये, तूंही पात्र सिद्धतेसाठीं जा. ( सर्व मंडळी जातात. ) असो, आज रसिक महाजनांपुढें केवळ व्यवहार-दर्शी अशा संगीत सत्यविजय नाटकाचा मी प्रयोग करून दाखविणार आहें, या साठीं बुधहो,

साकी.

शांत मनानें नव—नाटककृति अवलोकावी जनहो ॥
कार्यारंभीं सविनय विनती करितों सकलांसी हो ॥
तोष अशा समयीं ॥ दासा आस दुजी नाहीं ॥ १ ॥

असो, पुढील तयारीकरितां मीही जातों. ( सूत्र-धार जातो. )

( इतक्यांत एक योगी प्रवेश करतो. )

**योगी**—जयशंकर—

दोहा.

आसका बाप, निरासकी मा ॥
होतेकी बेहेन, निदान्‌का दोस्त ॥ १ ॥

जोरू साथ, पैसा गांठ ॥

जागे सो पावे और सोवे सो गमावे ॥ १ ॥

ये दोहोरेका मायना एक मराठी कवी क्या बोलता है देखो,—

पद. ( हँ हँ रविकुलभूषण० या चालीवर. )

जगिं आशेचा पिता असे हा माता साध्वी ही ममतेची ॥ भगिनी धनाची स्त्री संगतिची पैसा लोभखनी जगताची ॥ परिणामीं या कोणि न दुसरा थोरवि गावी किति मित्राची ॥ जो सावध तो सुखी सदोदित बेसावध मृगया कालाची ॥ असत्य वाणी नहो कदापी अनुभव सिद्धी या गोष्टीची ॥ हृत्पटलावरि खोदुनि ठेवा अक्षय वाणी ही साधूची ॥ १ ॥

ये दुनिया कितनी बहिरी है देखो. अहाहा ! ये साधुक्तीकू मै हमेषा रातदिन पुकारताहुं, लेकिन् इस अन्दरका मायना जाननेवाला कोईबी भगवतका लाल हमकू मिलता नहीं. ये क्या अजायब है ! चलो. अब थोडा वख्त ये कामधेनू फिराके पीछे अपना मखसूस कामके वास्ते चले जाएंगे. हाँ इधर बेपारी लोगोंकी बडी पेठ नजर आती है, तो अब यही रस्तेसे चलेंगे.

( योगी निघून जातो. )

## प्रवेश २ रा.

स्थळ—एका व्यापाऱ्याचें मोठें दुकान.

( सत्यविजय व त्याचे दिवाण प्रवेश करितात. )

सत्यविजय—वहावा !

पद. ( राग—केदार, ताल—दादरा )

भाग्यवान । मजसमान । कोणि नसे त्रिभुवनांत ॥ अगणित धन जनकानें ॥ मिळवुनि बहु यत्नानें ॥ रंगलाल । सर्व काल । ह्मणुनि असे मी जगांत ॥ धृ० ॥ याचकजन तृप्त करुनी ॥ तोषवीन नित्य भुवनीं ॥ मनुज—जन्म फिरून कधीं येईल कां भूतलांत ॥ १ ॥ धर्म अर्थ काम मोक्ष ॥ साधुनि जो देइ लक्ष ॥ तोच ईशपादकमलिं ॥ होइल रत हेंच खचित ॥ २ ॥

कां दिवाणजी, मी ह्मणतों हें खरें कीं नाहीं ?

दिवाणजी—अण्णासाहेब, आपण ह्मणतां तें अगदीं योग्य आहे. धनवानानीं अशी सद्बुद्धि मनांत आणणें, हें वावगें कोण ह्मणूं शकेल ! पण वडिलांचा जोंपर्यंत अंमल आहे, तोंपर्यंत आपल्या मनाप्रमाणें होईल, असें मला तर खचित वाटत नाहीं. कारण काय हें आपल्याला माहीतच आहे.

सत्यविजय—ह्मणून तर मी तूर्त स्वस्थ आहें. वडलांना दोष देणें हें कांहीं चांगलें नाहीं, असें जरी आहे, तथापि त्यांचा धन संपादन करण्याचा मार्ग मला मुळींच पसंत नाहीं. द्रव्यलोभ मोठा वाईट आहे, ह्यानें ज्याला ग्रासून टाकलें, तो केवळ पातकाची मूर्ति असें मी समजतों. व्यापार करा, कांहीं करा, सचोटीनें जी कांहीं योग्यता मिळते, तितकी कशानेंही मिळत नाहीं. ऐका—

दिंडी.

मिळे सत्फल उद्यमा सचोटीनें ॥
ठार बुडतो व्यापार लबाडीनें ॥
द्रव्यलोभानें सत्य नाश होतो ॥
लोभ सकलां ओढुनी नरकिं नेतो ॥ १ ॥

असो, आज कुळाकडील बाक्या वगैरे कांहीं वसूल झाल्या कीं नाहीं? हें पहा, कुळाला गोड बोलल्यानें तें खूष होतें, यासाठीं तगादा करणें तो देखील बेताबातानेंच करण्याबद्दल नोकरांना ताकीद द्यावी. एकादें कूळ गरीब असतें, तगाद्याचा शेर देण्याची देखील ज्याला ताकद नसते, त्याला विशेष त्रास न देतां आपणच शेर वसूल करण्याची कामगिरी त्याला सांगून पोटाला द्यावें ह्मणजे झालें. बरें, जो कांहीं वसूल झाला असेल, तो कीर्दींत नमूद

करा. बरें, पण, हा येथें दीनवाणें तोंड करून सर्वांपासून कोण बरें बसला आहे ?

दिवाणजी—हें आपलें फार दिवसांचें कूळ आहे. जमिनींत पीक न आल्यामुळें ह्याच्याकडे खंडाबद्दल दोन वर्षांचें धान्य येण्याचें राहिलें आहे. गुरें ढोरें रोगानें व चाऱ्याच्या कमतरतेमुळें बरींच मेलीं. जीं शिल्लक आहेत तीं शेतकीच्या कामाला निरुपयोगीं असल्यामुळें जनावरें विकत घेण्यासाठीं कांहीं मागण्याकरितां आला आहे. बाबासाहेब ह्मणतात कीं, मागील बाकीची फेड झाल्याखेरीज एक पै देखील मिळणार नाहीं. ह्मणून निराश होऊन दीनवाणें तोंड करून उभा आहे.

सत्यविजय—कायरे बाबा, तुझें याच्यावर काय ह्मणणें आहे ?

कूळ—( हात जोडून ) अन्नासाब, अंवदां लाकीनं ढोरं मेलीं पघा. वक्तावर पाऊस पानीबी पडल न्हाई, तवां गरिबाचं ह्मननं इकतंच कीं, या वक्ताला साठ रुपई द्या. मी कागद लिहूनशान देतुया. चार गुरं ढोरं घेवुनशान येत्या सुगीला आपला दोन वरसांचा खंड देतों. थोरला पोरगा चाकरीला ठेवतों. पोटाला घालून देवसं वाटलं तर द्या. झोरल्या वरसाला आपली समदी न

समदी बाकी याजासुद्धां चुकिवतों. मागं चार कच्चीं बच्चीं हाइती; माझ मायबाप तुमींच, पदर पसरून आलुंया. मर्जीपरमान वाटेल त्ये करा. खंडोबाच्यान् चिमुटभर दाना अगर गोटा असल तर.

**सत्यविजय**—दिवाणजी, इतक्या कंगाल स्थितीला जर आपलें कुळ येऊन पोंचलें आहे, तर कागद लिहून घेऊन द्याना कां त्याला साठ रुपये? आपल्या कुळाचा बचाव जर आपण न केला, तर दुसरें कोण करणार?

**दिवाणजी**—अण्णासाहेब, बाबासाहेबांचें ह्मणणें, थकलेल्या बाकीबद्दल फिर्याद करून, ती वसूल करून घ्यावी; आणखी आपण ह्मणतां कीं साठ रुपये द्या. तेव्हां हें कसें जमेल तें जमो बुवा.

**सत्यविजय**—( धिक्कारयुक्त मुद्रेनें ) जमायचें तें काय? विनाकारण फिर्यादी अर्यादी करून आपलें व दुसऱ्याचें नुकसान करण्यांत अर्थ तो काय? साठ रुपयांची गोष्ट ती काय! आज मनांत आणलें तर सत्तेनें एकाद्या सत्कृत्याला लाख रुपये पडले तर देईन. धनवानांनीं गरिबाच्या उपयोगीं पडावें, हेंच थोरपणाचें लक्षण होय. मग अशा कृत्यांत बाबासाहेबांनीं स्वतः कांहीं जरी केलें, तरी मी

तें आनंदानें पतकरीन. ह्या त्या गरिबाला साठ रुपये. बिचारा आनंदानें दुवा तरी देईल कीं नाहीं ?

दिवाणजी--मला काय मी हुकुमाचा चाकर. बाबासाहेब जाणे व तुह्मी जाणे. हं, हे घेरे बाबा साठ रुपये. ( असें ह्मणून रुपये देतो. ) अण्णासाहेब, व्यापारामध्यें भोळेशाई मुळींच उपयोगाची नाहीं. वांझाला गांजून घेणें हेंच रास्त. माझ्या मतें आपण केलेली गोष्ट बाबासाहेबांचे मनास येईल असें मला कांहीं वाटत नाहीं.

( इतक्यांत पूर्वीचा गोसावी "**जगिं आशेचा पिता असे हा**" हें पद ह्मणत प्रवेश करतो. )

सत्यविजय--अहाहा ! किती गमतीचा ह्या कवनाचा अर्थ आहे. दिवाणजी, ऐका तो काय ह्मणतो तें ? ( दुकानांतून बाहेर येऊन महंताला उद्देशून ) आपण आतां जें कांहीं ह्मणालात तें फिरून ऐकण्याची माझी इच्छा आहे. जर ह्मणाल तर पहा.

योगी--( आपल्याशीं ) ये सब अलम दुनियेमें ये कवनकी लेहजत जाननेवाला ये इतना जवान्मर्द हमकूं आज नजर आता है. क्यौंके किसीनेबी ये कवन फिर सुन्नेकी उमेद हमकूं आज दिनतक नहीं बताई, और ये कवनकी लेहजतकी चटक उसके दिलमें अच्छी तऱ्हेंसे लगगई है; सबब ये

कवन फीर सुन्नेकी खवायष रखता है. और इस-बाबतमें ये चाहिये इतना पैसाबी खरच करेगा, लेकिन् आपनी उमेद पुरी करेगा; ऐसा उसका नूर कह देता है. अछा कुच फिकीर नही, ये परिच्छा देखनेका वख्त है ये गमाना नहीं. ( उघड ) क्यौं बेटा ये कवन फीर सुन्नेकी तेरी उमेद है ? तो फीर कहिनेके वास्ते सव्वा लाख रुपये पडेंगे सो तूं देएगा ?

दिवाणजी—काय ह्मणतोस सव्वा लाख रुपये पडतील ? अशा भीक मागत फिरणाऱ्या गोसाव्यांना एका कवनाला सव्वा लाख रुपये मिळते, तर मग भीक मागावीच लागली नसती.

योगी—देखो महाजन्, आप कहतेसो सच् है. भीक मंगने-की बात तो अलग है, जिसको ये कवनकी चटक लगी, वोही ये कवनका मोल जाने; गैरोंकु क्या फायदा. कैसे क्या बेटा, मैंतो सव्वा लाख रुपये लिये बिगर कबी कहिनेका नहीं. कैसा क्या बेटा तेरा बिचार है ? नहीं तो हम रस्तेसे चले जाएंगे. हम कूच तेरे दरवाजेपर खडे रहिनेकु नहीं आये,

( जाऊं लागतो. )

सत्यविजय—ठीक आहे, देतों सव्वा लाख रुपये; पण पुन्हां ह्मणा.

**दिवाणजी**–अण्णासाहेब, अहो ह्या भोंदूंच्या नादीं तुह्मीं काय लागतां; अहो असे लोक कैक येतात व कैक जातात, त्यांच्याकडे काय लक्ष देतां आपण, असे लक्षावधी रुपये मिळते, तर कटोऱ्या घेऊन दारोदार भीक मागत कां फिरते ! ( खिशांतून पैसा काढून त्याच्या आंगावर फेंकतो ) जा हो चालता.

**योगी**–( रागानें ) चल झूट. ( असें ह्मणून जाऊं लागतो तोंच, )

**सत्यविजय**–साधो, आपण रागानें जाऊं नका, मी सव्वा लाख परुये देण्याला तयार आहें, बोला.

**योगी**–पहिले ह्यां धरदे. पिछे सुनाएंगे.

**सत्यविजय**–दिवाणजी, काढा सव्वा लाख रुपयांचीं रत्नें.

**दिवाणजी**–आपण द्या ह्मणतां पण बाबासाहेबांच्या हुकुमाखेरीज मला तसें करतां येत नाहीं.

**सत्यविजय**–( रागानें ) बस्स; तुह्माला जास्त बोलण्याची जरूर नाहीं. तुह्मी हुकुमाचे नोकर, देतां किंवा नाहीं ?

**दिवाणजी**–मी देत नाहीं.

**सत्यविजय**–काय ह्मणतां, मी देत नाहीं ? आणा इकडे चाव्या. ( चाव्या घेण्यास लागतो. )

**दिवाणजी**–बाबासाहेबांच्या हुकुमाखेरीज मी चाव्या देत नाहीं.

11–14 missing

ह्यानें दिले असतील, इतका कांहीं तो दुधखुळा नाहीं.

धनमित्र—या अशा लाडानेंच तर सर्व घाण होते.

पद. ( वाट बघत द्वारीं० या चालीवर. )

लाडानें खचित पहा पोरें हीं शेंफरति ॥
उद्यमविरहीत सदा चैन करोनी फिरती ॥
॥ धृ० ॥मोल नसे पैशाचें बेगुमान बहु असती॥
उधळिती धन स्वमतानें भीति मनीं नच
धरिती ॥ फल याचें भोगाया ठेवियलें
तुजपुढती ॥ लाडानें० ॥ १ ॥

त्याच्या बरोबर तूं जरी भीक मागत गेलीस, तरी बेहत्तर.

लक्ष्मी—कांहीं तरी विचार करा, इतकें आकाश पाताळ एक केल्यानें होणार काय ? देवानें ज्याला त्याला शेर नेमून दिलेलाच आहे.

धनमित्र—पहातों आतां शेर कोठें नेमिला आहे तो ! माध्यानकाळ आला ह्मणजे सुख समजेल. मालपुवे, शिरापुरी विसरा आतां. होतोस कीं नाहीं चालता ? तुला पाहिल्यानें माझ्या पायांची तिडीक मस्तकाला जाऊन पोंचते.

पद. ( झंपा )

असा दुर्मती निपजला तरि कशाला ॥
याहुनी जन्मता कां न मेला ॥ असा दुर्मती ॥

पुत्र मम हा जरी शत्रु सम भासतो ॥
लोचनीं जणुं पहा शल्य सलतो ॥ चलता हो
कसा येथुनी झडकरी ॥ आजपासोनि
संबंध तुटला ॥ असा दुर्मती निपजला० ॥ १ ॥

सत्यविजय—नशिबीं असेल तर मालपुवेचसे काय, पण हजारों गोरगरिबांना षड्रस अन्नें कां घालणार नाहीं? 'नर करनी करे तो नरका नारायन होय.'

पद. ( सुखोपभोगा० या चालीवर. )

अंध पंगु वा नाहीं वेडा बधिर मुका थोटा ॥
तनु झिजवोनी ही दिनरजनीं मिळविन
मी पोटा ॥ धन संपादन करावयाचा मार्ग
असा खोटा ॥ मुळीं नको मज स्पष्ट सांगतो
झाला जरि तोटा ॥ 'अपापाचा माल गपापा'
जाउनि लंगोटा ॥ नशिबीं येतो सत्य करिं
मग भिक्षेचा लोटा ॥

धनमित्र—आजाला नातू उपदेश करितो आहे पहा! जित्याची खोड मेल्याशिवाय जाणार नाहीं. पहातो कीं आतां चंडूलालाची काय करामत आहे ती? असा कुलांगार पोटीं येण्यापेक्षां मुळींच निपुत्रिक असलेलें बरें!

सत्यविजय—

पद.

मधुरसुधावाणीश्रवणिंवसो ॥ पुत्र-प्रेमा धन-
लोभाहुनी ॥ न्यून वाटला जनका या जनीं ॥

मायां[1] टाकी ममता तोडुनी ॥ लोभी नरा वाखाणी ॥ कलीची ॥ १ ॥

धनमित्र—या भाषणानें माझा कोपानल जास्तच पेटला ! तुला चालता हो ह्मटलेंना ? अजून तूं येथेंच. जा अगोदर, तुझ्या संतापानें मला वायु होण्याची वेळ आली.

सत्यविजय—( हात जोडून ) बाबासाहेब, आपला वायु माझ्यावरच लोटून द्या कसा. दुर्व्यसनांत पैसे उधळले असते तर आपलें बोलणें किती उपदेशपर झालें असतें बरें ? मी आपणाला सांगतों कीं, जगांत धर्मावांचून मला कांहींच प्रिय नाहीं.

पद्य. ( झंपा )

धर्म कारे मुक्त हा मानवाला जनीं ॥
याहुनी पूज्य मज नाहिं कोणी ॥ द्रव्य-
लोभी नरा ओढुनी दरदरा ॥ नेति यम-
दूत ते हाल करुनी ॥ मोहजालीं पहा जन
किती गुंतुनी ॥ वास नरका मधें करिती
फसुनी ॥ टाकुनी अमृता गरल सेवील जो ॥
त्यास शिक्षा असे कालसदनीं ॥ १ ॥

धनमित्र—ठीक आहे, आह्मीं जाऊं तेव्हां जाऊं नरकांत; पण तुह्मींच आमच्या आधीं चला. एका क्ष-

1 पैसा.

णांत आतां तोच तुझ्या नशिबीं आहे समजलास ? काय पराक्रम करशील तो पाहीन.

**सत्यविजय**---तात महाराज, ठीक आहे. आपला रागयुक्त जरी आशिर्वाद असला तरी ज्यानें मला जन्म दिला, त्याला माझी थोडीशी तरी लाज असेल.

**धनमित्र**—हँ आटप लौकर. ते दागदागिनें सर्व कांहीं काढ आंगावरचें; कोण आहेरे तिकडे, गेन्या ? ( गेन्या येतो ) ग्येन्या—जी काय हुकूम ? अगोदर जा याला फाटकेसें धोतर, बंडी आणखी फाटका रुमाल आणून दे पाहूं ? ( गेन्या जातो व कपडे आणून देतो. ) ( बायकोला उद्देशून ) खबरदार जर याला पैसा अडका देशील तर तर. जर का दिलास तर तुला देखील पंढरीची वारकरीण करीन समजलीस का ? ( 'असा दुर्मती' हें पूर्वोक्त ह्मणून जातो. )

**सत्यविजय**—( दुःखानें ) हाय हाय ! माते, आतां मी तुला अंतरणारना ?

**पद.** ( सुंदरी रम्य मंदिरीं॰ या चालीवर. )

**नव मास । उदरीं सहवास । करुनि सायास ।**
**दिले मी जननी ॥ ऐन समयिं तुज जाउं**
**कसा सोडोनी ॥ ध्रु॰ ॥ बा धना । तात सुत**
**मना । बिघडवुनि जना । मौज दाखविसी ॥**

असुनि एकटा सकल जगावरि फिरसी ॥ १ ॥ प्राक्तना । तुजसि यातना । भोगिल्याविणा । नसेरे सुटका ॥ प्रथम दर्शनीं अनुभवास आला फटका ॥ २ ॥

ळक्ष्मी—बाळा सत्यविजया, आतां कुणाच्या आशेवर मी आपलं दुःख सोसूं ! देवा ! माझ्या मुखांतील सुग्रास तूं एकाएकीं कसारे काढून नेतोस ? बाळा, मला एकटीला टाकून देशांतराला निघून जाणं तुला कसं बरं रुचतं ? हें पहा, आपल्या हातानं माझी काय ती व्यवस्था कर, नाहींपेक्षां फिरून तुझ्या व माझ्या भेटीचा योग जुळून येईल इतकी कुठं मी भाग्याची आहे ? ( गहिंवरते. )

सत्यविजय—( दुःखानें ) आई, विनाकारण दुःख काय ह्मणून करतेस ? अग, पूर्वींच्या पुराणांतल्या गोष्टी ध्यानांत आणून विवेक कर; हें पहा, प्रसंगीं धीर सोडल्यावर मग उपयोग कोणता ?

ळक्ष्मी—बाळा, धीराचं मंदीर ओस पडल्यावर त्याला ठेवावं तरी कुठं ? येऊन जाऊन सर्व आशा तुजवरच अवलंबूनना ? मग तुझी व माझी ताटातूट झाल्यावर ह्या ह्मातारीनं कसे बरं दिवस लोटावेत ? ( रडूं लागते. ) उन्हांतून अनवाणी माझ्या लाडक्याचे पाय दुखतील, त्याचा जीव कासावीस

होईल, त्या वेळीं त्याच्या पायाला कोण बरं तूप चोळील, अशा एकना दोन, हजारों गोष्टी मनांत एकदम उभ्या राहिल्या कीं, हा प्राण नकोसा होतो! दुसऱ्याकडे बोल लावून उपयोग कोणता? आपलं प्राक्तनच खोटं झालं!

सत्यविजय—माते, तूं जर असें करूं लागलीस तर दुर्धर प्रवास माझ्या हातून कसा बरें कंठवेल? असे पहा, होत असलेलें सर्व दुःख विवेकानें सहन कर. आणखी

पद. (भूप कल्याण.)

आनंदें दे निरोप मातें ॥ शोक वृथा तूं न करी
माते ॥ धृ० ॥ दुःख असें गे मार्ग सुखाचा॥
अंत न कोणा विधिलेखाचा ॥ दया असे
त्या जगदीशातें॥१॥ माता दैवत या भूवरती॥
बाकी कोणा कोणि न पुसती ॥ असतील
शितें तोंवरी भुतें ॥ आनंदें दे० ॥ २ ॥

माते, आतां निरोप देतेसना?

लक्ष्मी—बाळा, क्षणांत कसारे माझ्याविषयीं निष्ठुर झालास?

सत्यविजय—माते, मी निष्ठुर झालों नाहीं; पण माझें प्राक्तन निष्ठुर झालें आहेना? हँ आटप लोकर तूं

आनंदानें 'ये बरें बाळा,' असें ह्मटलेंस कीं, मी कोठें जरी गेलों तरी मला कांहींएक न्यून पडणार नाहीं.

**लक्ष्मी**—बाळा, थोडासा दम खा. जातांना मार्गांत उपयोगीं पडणाऱ्या चार लाडवांच्या गोळ्या देते, त्या घे, आणखी मग ह्या ह्मातारीच्या दृष्टिआड हो. ( एकीकडे जाऊन एकेक रत्न एकेक लाडवांत घालून घेऊन येते. ) बाळा, हें घे. ही ह्मातारी आणखी तुला काय बरं देणार; ( लाडू देते. )

**सत्यविजय**—( गहिंवरून )

पद. ( राग–बेहाग, ताल–दादरा. )

**मातेसम दैवत नच अन्य भूवरी ॥ एक-**
**निष्ठ प्रेम हिचें वानुं किति तरी ॥ धृ० ॥**
**जन्माची सौख्य-खनी ॥ जाउं कशी सो-**
**डोनी ॥ अंतरला तुज जननी ॥ दुर्भागी**
**दिनरजनीं ॥ हा प्रवास सुखकरहो मजासि**
**श्रीहरी ॥ १ ॥**

माते, आतां तुला मी जास्त तें काय सांगूं; पण इतकीच इच्छा आहे कीं, ईश्वरावर हवाला ठेवून दुःख विसरून जा. तुझ्या आशिर्वादानें व ईशकृपेनें मार्गांत कसलेही प्रसंग आले, तरी मी सर्वांतून पार

पडेन, व फिरून तुझें दर्शन घेईन, तरच तुझ्या पोटीं मी जन्माला आल्याचें सार्थक होईल.

लक्ष्मी—बाळा, मी दिलेला खाऊ, ज्या वेळीं तुला अगदीं उपासाची वेळ येईल त्या वेळींच खा अँ! कंदमुळें सेवन करण्याचें तुझ्या नशिबीं आलें त्याला इलाज नाहीं! वाटेंत तुझ्या ताईचा गांव आढ-ळेल तिथें जा, आणि तिला भेटून मग पुढें जा बरें. बाळा, आतां हें मी सांगितलेलें सर्व ध्यानांत ठेव-शीलना? हें पहा नेहमीं सावधगिरीनें वागत जा बरें!

सत्यविजय—माते, हे तुझे अमोल्य शब्द मी आपल्या हृत्पटलावर खोदून ठेवितों बरें!

पद. ( अवनिपातिस० या चालीवर. )

**प्राणाहुनि तव प्रसाद जपुन ठेवितो ॥ संकट-**
**समयास यास खचित सेवितो ॥ धृ० ॥**
**सत्य तूंच या जगतीं एक विभूती ॥ निर्मि-**
**यली श्रीविधीनें वानुं मी किती ॥ त्वत्प्रेमा**
**अंत नसे गुंगली मती ॥ हृदयीं तुज दिन-**
**रजनीं जपुन ठेवितो ॥ १ ॥**

माते आतां तुझा आशिर्वाद दे कीं चाललोंच,
( पायांवर मस्तक ठेवितो. )

लक्ष्मी—( मुलाला उठवून त्याला आलिंगन देऊन व कुरवाळून ) उदंड आयुष्याचा हो, बाळा जा बरें!

( गहिंवरून ) प्रवासाचं काम मोठं कठीण आहे, तेव्हां जपून वागत जा. बाळा थांब. थोडासा उभा रहा. आरती ओंवाळून हातावर थोडकें दही घालतें नि मग जा बरं ( आरती ओंवाळून हातावर दही घालते. )

सत्यविजय—

मिश्र श्लोक.

हा होतो चालता मी जननि तुझिया पाद-
पद्मा नमोनी ॥ ठेवी पश्चात् ईशा सुखि
दिनरजनीं मातृदेवी त्यजोनी ॥ झालों
आजी प्रवासी ह्मणुनि मजसि दे धैर्य
गांभीर्य आतां ॥ स्नेही माझे करोत मजला
साह्य हे विश्वनाथा ॥ १ ॥

( मातेचे चरण वंदून निघून जातो. )



# अंक २ रा.



## प्रवेश १ ला.

स्थळ—मार्ग.

सत्यविजय—भो साधुवरा, तुझी अमृततुल्य वाणी कधीं-हीं असत्य होणार नाहीं.

पद. ( स्वमनास येइना शांती० या चालीवर. )

धनलोभापुढती नातें ॥ विसरुनिया निष्ठुर
ताते ॥ घालविलें आपुल्या हातें ॥ सदनां-
तुनी कैसें मातें ॥ प्रिय पुत्र । होतसे पात्र ॥
पिसाला मात्र ॥ जो वित्ताते ॥ मिळवुनिया
देइल सातें ॥ १ ॥

वा धना तुझें मोहनीजाल इतकें कांहीं विलक्षण आहे कीं, त्याचें वर्णन देखील करतां येत नाहीं.

पद. ( एकांतवास हा० या चालीवर. )

हा अर्थ करितसे अनर्थ केवळ जगतीं ॥ यदा-
भिलाषें सूज्ञ किती तरि फसती ॥ हा स्नेह
जोडितो परी न टिकतो पुढती ॥ यासम
चंचल कोणि नसे भूवरती ॥ चाल ॥
वा धना नाहिं तुज माया तिळभरी ॥ स्थीरता

मुळीं तुज नाहीं क्षणभरी ॥ तूं सखा नससि कोणाचा भूवरी ॥ श्रेष्ठ तूं खरा तुझी कळा बहु चढती ॥ मूर्ख होति ते खरे तुला जे मुकती ॥ १ ॥

( आपल्या शरिराकडे पाहून ) बा शरिरा, तुजवर एकाएकीं दुःखाचा प्रसंग आला आहे; यासाठीं माझें तुला इतकेंच सांगणें आहे कीं—

पद. ( ज्यासी निर्धनता गांजी० या चालीवर. )

सोडी कोमलता शरिरा ॥ सोशी प्रखर असुख मारा ॥ स्वशिरीं दुःखाचा भारा ॥ घेई जगतिं न तुज थारा ॥ तुजवर दुस्थितिचा फेरा ॥ आला दुर्दैवें सारा ॥ खेळ कलीचा धन बंधूसह बिघडवि संसारा ॥ ह्मणुनी सेवी कांतारा ॥ १ ॥

असो, रात्रभर मार्ग क्रमण करतांना फार थकवा आला आहे, तेव्हां मातेनें सांगितल्याप्रमाणें आपल्या प्रियभगिनीची भेट घेऊन कांहीं दिवस तिच्या घरीं राहून मग पुढील मार्ग धरावा. अद्याप भगिनीचा गांव किती लांब आहे हें कांहीं समजत नाहीं.

( इतक्यांत एक प्रवासी येतो. )

सत्यविजय—नमस्कार प्रवासीबुवा.

प्रवासी—नमस्कार.

**सत्यविजय**—प्रवासीबुवा, आपण कोणीकडे चालला आहांत ?

**प्रवासी**—चाललों आहे बाबा वाट फुटेल तिकडे पोटाच्या पाठीमागें. तुह्मीं कोणत्या गांवाला चाललात ?

**सत्यविजय**—प्रवासीबुवा, मला तारापुराला जावयाचें आहे, बरें पण तारापूर येथून किती कोस आहे हो ?

**प्रवासी**—काय, तारापूर ? तारापूर येथून अजमासें दोन कोस येईल. कांहो तारापुरांत कोणाकडे आपण जातां ?

**सत्यविजय**—तारापुरांत ते रावसाहेब इनामदार आहेत, त्यांच्याकडे चाललों आहें.

**प्रवासी**—तर मग थोरांच्याच घरीं चाललांत एकूण. बरें, जा बरें. वाहवा, काय त्या रावसाहेबांचें आगतस्वागत विचारावें; अहो, आल्यागेल्याला अन्न घातल्याशिवाय बाहेर जाऊंच देत नाहींत. पण तेथें एक गम्मत दृष्टीस पडली.

**सत्यविजय**—( उत्सुकतेनें ) ती कोणती हो, मला तरी ऐकूंद्या.

**प्रवासी**—गोष्ट मोठीशी महत्वाची नाहीं, पण कुटुंबाचा स्वभाव जरा गरम असून दातृत्वशक्ति कमी दिसते. असो, खाल्याघरची निंदा करणें वाईट खरें, पण प्रवाशानीं प्रवाशाला असली हकीकत सांगितली तर

त्यांत कांहीं वावगें नाहीं. चला आतां, बोलत राहिल्यानें रस्ता आंवरणार नाहीं, तर आतां मी येतों. नमस्कार. ( प्रवासी जातो. )

**सत्यविजय**–( आश्चर्यानें ) यानें जी हकीकत सांगितली, ती माझ्या भगिनीचीच, पण असें जरी गृहित धरलें तरी माझी बहीण फार सुशील आहे; आणखीं नांवाप्रमाणें ती खरीच सुशिला आहे. किती उदार स्वभाव तिचा ! माझ्यावर तिचें किती प्रेम! अण्णा वांचून दुसरें तिला कांहींच प्रिय नाहीं. नाहीं तरी मी बरेंच वेळां तिच्या घरीं गेलों आहे, पण ह्या प्रवाशानें सांगितल्याप्रमाणें तिची वृत्ति मला कधींही दिसली नाहीं, मग अलीकडे वर्ष सहा महिन्यांत कांहीं फरक पडला असेल तर न कळे. असो, आपणही आतां ती प्रसंगीं कितपत उपयोगी पडते, याची परीक्षा पहावी. गांव तर दिसूं लागलाच ( न्याहाळून पाहून ) ही इकडे खाशी विहिर दिसत आहे. इचें पाणी विपूल असून स्वच्छही असेल, तेव्हां स्नान वगैरे आटपून घेऊन थोडीशीं जांभळें, बोरें खाउन पाणी प्यावें. सूर्य अगदीं माध्यान्हीला आला आहे; तेव्हां वेळींच आत्मारामाची तृप्तता करून या गर्द छायेंत थोडासा आराम घेऊन जरा ऊन्ह खालीं झाल्यावर मग गांवाचा रस्ता धरावा

कोठेंही गेलों तरीं वेळ साधून जावें; भलत्या वेळीं गेलें तर भिक्षा देखील कोणी घालणार नाहीं. देवा काय हा प्रसंग !

पद. किति मधुर रूप, या चालीवर.

**मज नाहिं संवय भिक्षेची ॥ याचना करूं**
**कोणाची ॥ जठराग्नि प्रज्वलतेची ॥ ही**
**क्षुधा खूणसे साची ॥ अन्नाविण शान्ती**
**साची ॥ कधिं नसे होत आत्म्याची ॥ आत्मा-**
**रामा करुनि चेतना माध्यान्हीं जाची ॥**
**ही क्षुधा सखी जगताची ॥ १ ॥**

कांहीं होवो, पण प्राण गेला तरी याचना ह्मणून करावयाची नाहीं. अयाचित् वृत्तीनें आपला मनोनिग्रह शेवटाला जातो कीं नाहीं, हें देखील मला पहावयाचेंच आहे. चला आतां स्नानाकरिता जावें. ( स्नान करून कंद मुळें खाऊन झाडाखालीं निजतो. )

( इतक्यांत दोन तीन गुरेंराखी येतात. )

बैज्या—बाब्या, सूर्व्या अक्शी डोक्शीवर आला किर. चला गड्यानू वाईशी न्ह्यारीबिरी करुनशान् झाडाखालीं डुलकी घेऊ. ह्मसरंबि पान्यामंदी बसल्याती, तवा न्होरी करूनशान् घेऊं. बाब्या, अर त्येका तुझ्या आईन आज कायर न्ह्यारीला दिल्या ?

**बाब्या**—अर, वाइच वांग आन् लोनच दिलया कोरड्यासाला. अन् बाजरीच्या हिरव्याचार भाकऱ्याबि दिल्यात. अन् तुला र ?

**बैज्या**—कोरडा झुन्का, अन् कांद्याची चटनी, आन् वांइच अंबीलबी, दिलीया. भैऱ्या तूर ?

**भैऱ्या**—मी व्हय, मी अंबाड्याची भाजी अन् लस्नाची चटनी आनलीया. उलिसा झुनकाबी आनलाया.

**बैज्या**—भैऱ्या, बाब्या, करुया इचिभन् गोपाळकालान् काय ? परवा इटुबाच्या देवळांत त्यो कतकरी सांगत न्हवता. कां, गोकुळामंदी किस्नबी गुराख्याबरोबर शिदोऱ्या खात व्हता. ठाव हाइका भैऱ्या ?

**बाब्या**—अरे भैऱ्याला का इचारतुयास, नांवापरमान् भैऱ्या ह्यो; दुसऱ्यानं सांगाव तवा त्येला कळनार ? कां असंच न्हव कां भैऱ्या ?

**भैऱ्या**—( रागानें ) मोटा श्येन्याचा कांदा ठाव हाइ की.

**बैज्या**—चला गड्यानों लई वखत झाला. आना हाकड शिदुऱ्या. ( सर्व शिदोऱ्या सोडून खात बसतात. )

**बैज्या**—( खातां खातां ) बाब्या, अर त्यो कोनर तकड, झाडाखालीं निजलाया. अर इचारा तरी, न्हेरीच्या वखताला आलाया, तवा इचारुंया त्येला न्हेरी करुतुस कां ह्मनून ?

**बाब्या**—व्हयर व्हय गड्या, आपल्या जवळबी रगडून भाकरी हाइती, खाईना बिचारा. वखतावर कुनालाबी जानावं.

**भैन्या**—अर त्यो बामनावानी दिसतुया. तवा भाकरी तुकडा त्यो कसार खाईल ?

**बैज्या**—अर बामन असला तर काय झालं. गोपाळ काल्यातलं कुनीबी खावं. ल्येका हात कां मास-मासकान हायका का ? मी इचारतु त्येला. ( सत्यविजयाला जागें करून ) कां बामनबुवा, न्हेरीबिरी केली कां ?

**सत्यविजय**—होय केली बाबा. थोडीशीं बोरं होतीं, तीं खाऊन पाणी प्यालों, कां बरं ?

**बैज्या**—तसं न्हव. वांइच आपुनबी भाकरी झुनका खावा ह्मनून ह्मनतों, अनमान नग. लई भुक्यालेवानी दिसताया, तवा ह्मटलं वांइच भाकर खाल्ली मंजी तकवा येईल.

**सत्यविजय**—बाबानों, तुह्मीं मला आदरानें बोलावलेंत, हें मला भाकरी खाल्या पेक्षां जास्त झालें. तुह्मीं स्वस्थ जेवा. माझें पोट भरलें आहे.

**भैन्या**—तोंडानं ह्मनताया भरलया. पन चेऱ्यावर कुठं दिसतया ? अव या राव तुमी. हत कोन बगतया ?

**सत्यविजय**—( आपल्याशीं ) हीं जातीनें कुणब्याचीं मुलें असून स्वभावानें किती उदार मनाची आहेत.

पहा. वास्तविक गरिबीच्या ठायींच लीनता व धर्म-बुद्धि जागृत असते, असें ह्मणतात तें कांहीं खोटें नव्हे. अप्रीतीच्या षड्रसान्नापेक्षां प्रीतीची मीठ-भाकर अतिशयित मौल्यवान असें मी तरी समजतों. कसलीही जात असो, मन शुद्ध झाल्यावर ह्मा-राच्या देखील ताटांत बसून जेवावें.

**बैज्या**—कां बामनबुवा, अनमान करताया जनू. अव या समद बसूनशान न्ह्यॅरी करुया. बामन तरी कंदीं आपल्या पंक्तीला मिळनार, ह्ये बगा.

**लावणी.**

**लइ ब्येस झुनका भाकर ॥ खाउनूशानी देऊं ढ्येकर ॥ जातग्वात यामदी कसलीर ॥ ध्येवि नजर वखतावर ॥ तुमी दिसन्यांत ऐट-बाज सरदार ॥ बोलन्यांत जनु साकूर ॥ आमी समद पायाचे चाकूर ॥ आमापरीस तुमी लई थ्वार ॥ १ ॥**

( सर्वजण आनंदानें शिदोरी खातात. )

**ऱ्या**—ह्यो मातुर खरा बामन. न्हाइतर नाक धरुन-शान् त्या कुळाकडून खंड आला कां न्हाई, त्यो कवा मरल, आन् माजं पोट कवा भरल, असच लई बामन. मन पाक तर संमद पाक. बामनबुवा, तुमचं त्वांड उतरल्यावानी कां दिसतया ?

**सत्यविजय**—नाहीं बाबा, चालून चालून थकल्यामुळें मी तुह्मांला असा दिसत आहें, इतकेंच.

**बैज्या**—असं ह्मन्‌ता तर तुमापाशीं कांबरून न्हाई, काईची न्हाई ह्ये कसं ?

**बाब्या**—पान्याचा तांब्याबी दिसत न्हाईन्; हंतरून कांबरूनबी दिसत न्हाई.

**सत्यविजय**—( आपल्याशीं ) हीं मोठीं चौकस मुलें दिसतात. आतां कसें बरें करावें ? ( विचार केल्यासारखें करून ) बाबानों, माझ्या बापानें मला घरांतून घालवून दिलें, ह्मणून मी प्रवासाला निघालों आहें बरें ? तुह्मीं माझे दोस्त झालांत ह्मणून सांगतों.

**बैज्या**—त्ये कशापाई ?

**भैऱ्या**—अर कशापाई ह्मंजी पैक्यापाई असल, बामन लई दुवाड असत्यात. ह्ये बग,—

लावणी.

**मोट तिकत समद खोट ब्येस जन्म आपला ॥**
**घ्येन देन नग कुनाच ऐक सांगतों तुलार जी ॥**
**पैक्यापायीं पोटचा गोळा हांकलून दिला ॥**
**बाप न्हव ह्यो जनु कसाई ऐक सांगतो तुलार जी ॥**
**म्येल्यावरत कोन इचारी मरदा या पैक्याला ॥**
**अक्शी न्हाई वळख याला ऐक सांगतो तुलार जी ॥**

बाब्या—मग आमी मरदा बर किर ! बामनबुवा, तुमी सांचपारी गांवामंदी जा. आमच्या गांवामंदी राव-साब इनामदार हाइती, त्येच्या घरीं लई बामन ज्येवत्यात, तवां तत जा, म्हंजी तुमची समदी तज-वीज लागल. रातच्यारात ऱ्हा अन् मंग जा म्होर-ल्या गांवाला.

सत्यविजय—किती गुणी हीं गुरेंराखी मुलें आहेत. असो, परमेश्वर ह्यांचें कल्याण करो.

भैऱ्या—( घाबरल्यासारखें करून ) अर ए बैज्या, बाब्या, अर त्येका म्हसरं आंब्या माळ्याच्या पिकांत शिरलीं बगा चला लौकर.

लावणी.

जाउं चला म्हसरं बगा पळून गेलीं दूर ॥
शेतांत शिरूनश्यान् खात्याल तूर ॥ धृ० ॥
धरून नेत्याल कुनी कोंडवाड्यामंदी ॥
पाटील लइ बग वंगाळर ॥ ढ्योरासानि
सोडित न्हाइ दंडाबगर ॥ १ ॥

( सर्व गुराखी घाईनें पळून जातात. )

सत्यविजय—चला आपणही आतां भगिनीच्या घरीं जाऊं. ह्या मुलांच्या गमतीच्या बोलण्यांत माझा वेळ केव्हां निघून गेला, हें मला मुळींच समजलें नाहीं.

( जातो. )

# प्रवेश २ रा.

स्थळ—सत्यविजयाचे बहिणीचा वाडा.

( सत्यविजयाचा मेहुणा विश्वप्रिय प्रवेश करितो. )

विश्वप्रिय—( चिंतायुक्त मुद्रेनें ) स्त्रियांच्या मोहजालांत मनुष्य एकदांका गुंतला, कीं त्यांनीं त्याला कबज्यांत घेतलाच. सुशील पत्नी माझी असती तर माझ्यासारखा सुखी कोणी नसता, पण करूं काय ? तिच्या रागीट स्वभावापुढें कमाल झाली, काय करूं ?

पद. ( वक्राकाल आला ह्मणुनी० या चालीवर. )

ज्या सदनीं शांती असते त्या स्थळीं रमेचा ॥
वास सदां असतो साचा ना तरी भिकेचा॥ धृ०॥
मूर्तिमंत येतो फेरा सहज दुर्गतीचा ॥
काय करूं युवती न्च दे लेश तो सुखाचा ॥
द्वेष सदां करिते ह्मणुनी सत्य या जिवाचा ॥
सहजपणें मजसी आला त्रास या जगाचा ॥१॥

काय करावयाचें या दौलतीला ! या त्रासामुळें केव्हां ना केव्हां मला वैराग्य घ्यावें लागणार, यांत बिलकूल शंका नाहीं. घरामध्यें पुरुषाला जास्त सुख काय तें गृहिणीकडून मिळावयाचें. श्रमहारिणी काय ती गृहिणी. पण त्याच्या उलट आहे माझी स्थिति—

पद.

न्यून नसें कसलें ॥ खचित मला न्यून नसें ॥
॥ धृ० ॥ अगणित धन मजजवळी असतां ॥
करूं कशाला निशिदिनीं चिंता ॥ परि
मन हें विटलें ॥ युवतिमुळें ॥ मन० ॥ १ ॥
सदा कर्कशा असुनि नारी ॥ सुख नच मि-
ळतें या संसारीं ॥ मन माझें विटलें ॥युव०।२।

( इतक्यांत सुशिला प्रवेश करते. )

सुशिला—का अद्यापपर्यंत इथंचना? शर्थ झाली बाई. परवां आली दिपवाळी सांगून ठेवते, जर जाडिताचा कंठा न आणला, तर मी कांहीं अन्न घेणार नाहीं. मेली नुसती तोंड पाटीलकी करायची, त्याला इतका आळस तो काय ह्मणून?

विश्वप्रिय—( विनयानें जवळ जाऊन ) हें पहा, उगीच रागाऊं नकोस, गोविंदपंताला दोन तीन वेळां मी सुंदर शेटीकडे पाठविला, पण त्याची कांहीं गाठ पडत नाहीं, मीं तरी काय करूं? तुला जर विश्वास नसेल तर हें घे कंठ्याचें सामान कसें. ( सामान पुढें ठेवतो. )

सुशिला—सामान दिलं ह्मणजे संतोष होईल असं आपणाला वाटतं कीं काय? ठीक आहे, उद्यांपासून स्वयंपाकाचं कांहींच कारण नाहीं तर? नुसती

डाळ, तांदूळ, आणि कणीक ताटांत वाडतें ह्मणजे झालं. कुणीकडून गोड बोलून वेळेपुरती समजूत करायची नि मग त्या गांवचंच नाहीं असंचना ?

विश्वप्रिय--बायकांचा पुरुषांवरती कधींतरी विश्वास असतो कां ? त्यांना वाटतें कीं, सत्याच्या पुतळ्या काय त्या आह्मीं. जेव्हां पहावें तेव्हां आपली रागानें मुसमुसलेली.

साकी.

हास्यमुखी जी युवती असते तीच सती सदनाला ॥
शोभा देउनि रमवि सदोदित आनंदानें पतिला ॥
गृहिणी तीच खरी ॥ विलसे निशिदिनीं संसारी ॥१॥

सुशिला—मग पहाना आतां एखादी हास्यमुखी रंभा ! चला, संपर्क देखील नको आतां. ( रागानें तप्त होऊन कोचावर बसते. )

विश्वप्रिय—अहाहा !

पद.

सदा तप्त मम युवती असते सोडिलें जिला
विनयानें ॥ जेव्हां तेव्हां नयना दिसते लाल
सदां जी कोपानें ॥ धृ० ॥ समजुत करुनी
दमलों अतिशय बोलुनि इजसीं मधुवचनें ॥
यत्किंचितही शांति न देई गांजलों इच्या
त्रासानें ॥ १ ॥

37, 38 missing

सत्यविजय—कां सुशिलाताई, अद्याप ओळख पटली नाहींका ? पहा. माझ्याकडे पहा. हें बघ.

पद. ( रमा करी मम मानें क्रीडा० या चालीवर. )

तुझा सहोदर तव सदनीं ॥ पुढति तुझ्या हा
उभा असे गे ॥ कां दुखवीसी कटुवचनीं
॥ धृ० ॥ सत्यविजय तव बंधू मी ना ? ॥ का
भया । मनिं नाहीं दया । किमपी तुझिया ॥
ऐशा समया ॥ मजवर करिशी कां गहजब
असा वृथा तूं प्रिय भगिनी ॥ १ ॥

सुशिला—चांगला ओळखला बरें तुला. माझ्या डोळ्यांवर कांहीं वडस वाढला नाहीं समजलास ? जा अगोदर दरवाजाबाहेर चालता हो. तूं इथं जास्त वेळ उभा राहिलास, आणि तें जरका लोकांना कळलं तर माझी फुकट फजिती होईल.

सत्यविजय—भो साधुवरा धन्य आहे तुमची ! सव्वा लाख रुपयांच्या रत्नाच्या ऐवजीं मी आपला प्राण जरी दिला असता, तरी आपल्या अनुभवसिद्धीला कमीच झाला असता.

पद. ( दशरथ स्त्रीवचनें फसूनी० या चालीवर. )

जोंवरी असे बंधूचा ॥ गरम खिसा भरपूर
धनानें तोंवरि भगिनीचा ॥ प्रेमा असतो
कीं साचा ॥ निर्धन झाल्यावरती होतो लय
मग प्रीतीचा ॥ हा खेळ किती गमतीचा ॥

विश्वरंगणीं सतत चालतो प्रभुच्या मायेचा ॥
शिणली सकलांची वाचा ॥ वर्णन करितां
करितां परि या अंत न लोभाचा ॥ १ ॥

गंगू—ताईसाहेब, अण्णासाहेब भुकेनं व्याकूळ झालेले दिसतात, तेव्हां त्यांना जेवायला घालून मग लावून द्या. कसं झालं तरी एका रक्ताचं नातं आहेना ?

सुशिला—पंक्तीला जेवण्याची त्याची आतां कुठं आहे योग्यता ? तुला दया येत असेल तर दे जा कांहीं शिळं पाकं उरलेलं. मला नको विचारूं.

गंगू—अण्णासाहेब, ताई साहेबांच्या बोलण्याचा आपण राग मानूं नका. त्यांनीं जरी अव्हेर केला, तरी आपण अन्नाचा अव्हेर करूं नये.

सत्यविजय—बरें, तूं तरी स्मरलीस ह्मणून सर्व राग गिळून तुझ्या बोलण्याप्रमाणें वागतों. आण, काय देशील तें या वेळीं गोडच समजेन; ( गंगी जाऊन भाजी व भाकरी पत्रावळींत गुंडाळलेली आणून देते. ) ( आपल्याशीं ) हे आत्म्याचें शांतवन करणाऱ्या अन्ना, जरी तुझा या वेळीं मी अव्हेर करीत आहें, तरी मला क्षमा कर. मी जगलों वांचलों तर पुढें मागें भगिनीच्या निष्ठुरतेच्या पुराव्यादाखल तूं मला फारच उपयोगीं पडणार आहेस. यासाठीं, मी स्वतः अंगावरील वस्त्राचें तुजवर आच्छादन घालून तुला जमि-

H81H6

नींत पुरून ठेवितों, तोंपर्यंत तूं येथें स्वस्थ ऐस. ( खळग्यांत अन्न घालून ठेवितो. ) गंगे तूं जा आतां अँ; मी हें सर्व खाऊन ओढ्यावर पाणी पिऊन तसाच पुढें चालता होईन. सुशिलाताई, आपले उपकार मी विसरणार नाहीं बरें; असो, मी बोलतों इकडे लक्ष्य दे ह्मणजे मी निरोप घेतों.

पद. ( राग—हमीर, ताल—त्रिवट. )

अन्न-तृप्तीची ॥ कमाल केलिस गे प्रिय
भगिनी बंधुप्रीतीची ॥ शिळी भाकरी
ज्वारीची ॥ आंबाड्याची भाजी तिजहु-
नी सरस होति साची ॥ धृ० ॥ आतां
पुनरपि भेटीची ॥ कपिलाषष्ठी येइल तेव्हां
आशा बंधूची ॥ सुशिले असुंदे लोभाची ॥
वृद्धि निरंतर हेंच मागणें शपथ तुला
पतिची ॥ १ ॥

सुशिला—जा, चांगल्या गुणाचा असतास, तर भाऊबीज नसती का केली ? खोड्याच्या कपाळीं कुऱ्हाडीचाच घाव पाहिजे. भोग आपल्या कर्माचीं फळं. तुझी पथारी इथं नको बरं कां ? कुठं तरी देवळांत अगर धर्मशाळेंत जाऊन खुशाल पड. रांडेबिंडेच्या पायींच बहुतकरून बाबासाहेबांनीं लाथा दिल्या असाव्यात.

सत्यविजय—अग निरोप तरी आनंदानें द्यायचा होतास; त्यांत तुझें कांहीं खर्च कां झालें असतें?

पद. ( झंपा. )

किती राग हा दांडगा भगिनि सुशिले ॥
आचरण हें तुझें हृदयिं ठसलें ॥ धृ० ॥
योग्य तूं वंदना ॥ अंगना या जनीं ॥
एक दिसतेस गे सकल भुवनीं ॥ वृत्ति
तव पाहुनी ॥ तृप्त मी जाहलों ॥ तात कां-
ता—कुला उद्धरीलें ॥ १ ॥

( जातो. )

---



# अंक ३ रा.



## प्रवेश १ ला.

स्थळ—रस्ता.

( सत्यविजय सचिंत असा प्रवेश करितो. )

सत्यविजय—या मानवी स्वभाववैचित्र्याची कमाल असो. खरी परीक्षा प्रसंगानुसार समजते, या गोष्टीचा अनुभव माझ्या हृत्पटलावर कसा कायमचा वठून गेला ! ज्या वेळीं मी सुशिलेच्या घरीं डामडौलानें येत होतों, त्या वेळीं माझ्या शुश्रुषेंत ती किती दक्ष असे, माझा अण्णा, माझा अण्णा असें ह्मणून अगदीं जीव का प्राण करीत असे. माझ्या अण्णाला खमंग खाणें आवडतें ह्मणून आचाऱ्याकडून केवढी मिजास राखी ! दासदासींना माझ्या सेवेंत राहण्याची त्यांना केवढी ताकीद ! माझे शालक रावसाहेब माझ्या मांडीशीं मांडी लाऊन गंजिफा बुद्धिबळें खेळत बसलेले, सदा अत्तरांत व सुगंधी पुष्पांत मी लोळत पडलेला; त्या हतभागी अण्णाची सद्दी उलटल्याबरोबर पहिल्या स्थितीची उलट स्थिति होऊन शिळी भाकरी व अंबाड्याची भाजी खाणारा मी त्या दुष्ट सुशिलेला नीच वाटलों ना ! हा केवढा कालच-

क्राचा विलक्षण फेरा आहे पहा ! असो, विपरीत काल आला, ह्मणजे सर्वांचीच अशी स्थिति होते, मग त्याबद्दल मी तरी काय ह्मणून वाईट वाटून घ्यावें ?

पद. ( वक्र काल आल्यावरती० या चालीवर. )

दैवगती फिरल्यावरती मान हानि होते ॥
रीत अशी जगताची ही अनुभवास येते ॥
विसरुनि ती गेली भगिनी प्रेम बंधुनातें ॥
दिनरजनीं पतिसह घेवो नित्य ती सुखातें ॥१॥

येथपर्यंत झालें हें कांहींच नव्हे, पण यापुढें जें कांहीं होणार आहे, याचा जगांत फारसा न घडलेला असाच अजब प्रसंग येणार आहे ! येथून पुढें माझ्या अकलेची परीक्षा मला जगाला दाखवावयाची आहे. केवळ बहुरुप्याची मला बतावणी करावी लागणार, तेव्हां डोळ्यांत तेल घालून नेहमीं मला दक्ष असलें पाहिजे. वेळ पडेल तशी बतावणी केली पाहिजे. कारण यापुढें संतवचनाप्रमाणें " जोरू साथ " ह्या जबरदस्त गोष्टीचा अनुभव मला घ्यावयाचा आहे. ( विचार करून ) आतां शागीर्दाचा वेष घेऊन श्वशुरगृहीं जावें, योगिराजानें दिलेल्या विभूतीचें चर्चन केलें ह्मणजे सर्वांच्या नेत्रावर खात्रीनें भ्रांतीचा ठसा पडेल. यासाठीं मना,—

पद. ( वाया शिणवुं नका० या चालीवर. )

माना । मानुं नको अवमाना । श्वशुर-
गृहीं जातांना ॥ आंवरून तूं रहा बरें कां
विसरुं नकोरे भाना ॥ कांता । निमुटपणें घे
अंता । साधोक्ती बघ आतां ॥ खरी कशी
ती होती बघरे क्षोभवूं नको पित्ता ॥
चित्ता । स्वस्थ रहा वपुनाथा । स्त्रीचरिताची
खरी परीक्षा पाहुन घेई आतां ॥ ध्याना ।
देईरे अवधाना । मानहानितें सोसुन होई
प्रियकर तूं सुजनांना ॥ १ ॥

( जातो. )

## प्रवेश २ रा.



स्थळ—चंद्रपूर.

( सत्यविजयाच्या सासऱ्याचा वाडा. भोजनोत्तर आराम घेत अस-
लेला सत्यविजयाचा सासरा व त्याचा मित्र प्रवेश करतात. )

चंद्रकेतू—कां विश्वसेन, महाराजांकडील बातमी तुम्हांला समजली असेलच ?

विश्वसेन—छे, मला कांहीं समजलें नाहीं. मात्र एक बातमी सहजासहजीं समजली आहे, त्याला आणखी आपल्या बातमीला कांहीं मेळ जमेल तर पहा.

चंद्रकेतू—सांगा पाहूं.

विश्वसेन—आपल्या कर्जाच्या फेडीबद्दल महाराज कांहीं गांव आपल्याकडे देऊन व्याजाची फेड करणार; मुद्दलाबद्दल रयतेवर कराचा नवीन बोजा लादून हपत्या हपत्यानें त्याची फेड करणार. परवां आपण बोलतां बोलतां महाराजांना थोडेसें चमकाविलें ह्मणून बरें झालें; आतां मात्र त्यांचे डोळे उघडतील. या नवीन मंत्रीमंडळानें जिकडे तिकडे इतकी कांहीं छाप ठेवून दिली आहे कीं, खुद्द राजेसाहेब ह्मणजे बुद्धिबळांतले राजे झाले आहेत! औरस संततीचें पाणी कांहीं निराळें असतें, पण हे दत्तक ह्मणजे शुद्ध गुळाचे गणपती! त्यांची महत्वाकांक्षा फक्त त्यांच्या मिजाशीपुरती. ज्यावेळीं आपल्याकडे खासगी दिवाणगिरी होती, त्यावेळीं खासगींत कांहीं ह्या मंडळीचा प्रवेश झाला नव्हता; पण तें सर्व बदलल्यामुळें ज्यांनीं ज्यांनीं खासगीकडील जिन्नस नेले ते तिकडच्या तिकडेच गार होऊन बसले! थोडक्यांतच पहाल ह्या महाराजांची जर अन्नान दशा न होईल, तर काय ह्मणाल तें ऐकेन. आरलें कळूंद्या.

चंद्रकेतू—विश्वसेना, तुमच्या व माझ्या बातमीशीं बऱ्याच अंशीं मेळ बसतो. मी तर असें ऐकिलें आहे

कीं, महाराज सर्व मंत्रीमंडळीला रजा देऊन पूर्वींच्या मंत्रीमंडळीवर सर्व राज्यकारभार सोंपविणार. याविषयीं महाराजांच्या अगदीं सन्निध असणाऱ्या एका गृहस्थाचें मला पत्र आलें आहे. हें वाचा. ( पत्र देतो. ) एखादे वेळीं महाराज खुषींत असले, ह्मणजे सदर्हू मित्रापाशीं ते कांहीं राज्यप्रकरणीं गोष्टी बोलतात. किती लीनतेचें पत्र आहे, पाहिलेंतना ?

**विश्वसेन**–( पत्र वाचून ) असें होईल तर प्रजेचे दुःखाला ओहटी लागलीच समजा. स्वराज्यांतली मंडळी जितकी माहितगार व दक्ष असतात, तितकीच बाहेरील मोठमोठी विद्वान् मंडळी असूनही निरुपयोगी असतात. वरील गोष्ट मागेंच घडून आली असती, तर महाराजांना इतक्या पेंचांत पडावें लागलें नसतें.

**चंद्रकेतू**-डोळ्यावरची धुंदी उतरली ह्मणजे खड्डा कोठें व मैदान कोठें हें सहज दिसूं लागतें. असो, वेळेवरच महाराज जागे झाले हें ठीक झालें. नाहींपेक्षां थोडक्याच दिवसांत फंदफितुरी झाली असती. ( इतक्यांत देवडीवरील शिपाई पत्र आणून देतो. पत्र घेऊन ) विश्वसेन, वाचा पाहूं पत्र तें.

**विश्वसेन**–( पत्र वाचतो ) वि० वि० आमचे चिरंजीव सत्यविजय हे भिकेच्या पंथाला लागल्यामुळें त्यानें

कांहीं तरी शुद्धीवर यावें, ह्मणून त्याला मी घरांतून घालवून दिला आहे, आज सहा सात महिने झाले. आपल्याकडे कदाचित् येण्याचा संभव आहे, तरी त्याला कोणत्याही प्रकारचा आश्रय अगर पैसा अडका कांहीं देऊं नये. वेळीं सूचना केली आहे, तिचा अनादर न होईल अशी आशा आहे. चिरंजीव सौ० मनोरमेला हें वर्तमान कळवूं नये. सूज्ञांस फार लिहिणें नलगे. लोभ करावा हे विनंति.

कांतीपुरकर **धनमित्र**, पेढीवाले.

**चंद्रकेतू**–( आश्चर्यानें ) सत्यविजय जामात सुशील असतांना त्यांचेकडून असा कोणता प्रमाद घडला ! त्यांचें वर्तन फार चांगलें असून स्वभावानें ते तर मोकळ्या मनाचे असत. बरें दुर्व्यसनी ह्मणावे तर तो गृहस्थ मोठा पापभीरू दिसे. मग काय असेल तें हरी जाणें. शिवाय अशी गोष्ट झाल्याबरोबर धनमित्रानीं न्यायानें ह्मटलें ह्मणजे ताबडतोब ही हकीकत कळवावयाची. सहा सात महिन्यानंतर ही हकीकत कळवितात, यावरून तीर्थरूपांचा त्यांचेवर मोठाच कोप झाला, असें उघड दिसतें. दिवसगत तर बरीच झाली; यापुढें सत्यविजय आमचे घरीं येतील अशी आशा मुळींच करायला नको. आले असते तर याचे मागेंच आले असते. मग बिचारा

कोठें भटकत असेल कोण जाणे. तूर्त पोरीचें कपाळ फुटलें असेंच समजलें पाहिजे.

**विश्वसेन**—खरोखर ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे !

**चंद्रकेतु**—वास्तविक आमचे आह्मींच फसतों. जितके ह्मणून धनवान् असतील, त्यांनीं आपल्या मुली बरोबरीच्या गृहस्थांचे घरीं न देतां, वास्तविक जितके पैसे खर्च करण्याचा संकल्प असतो तितका पैसा खर्च करून एखाद्या कुलीन व गरीब अशा घराण्यांत आपल्या मुलीचें सालंकृत कन्यादान करण्याचें जर मनांत आणिलें, तर शेंकडो गरीब कुटुंबें उदयाला येतील. तूर्त ही मोठीच चिंता उत्पन्न झाली ह्मणावयाची. बिचारा कोठें कां होईना, पण सुखरूप असो ह्मणजे झालें. खचित् ते येथें आले असते, तर खुशाल घरजांवयासारखे ठेवले असते. पण दोघांच्या नशिबीं पाहिजेना ? ( सचिंत होतो. )

**विश्वसेन**—हें पहा, ते जर सूज्ञ आहेत तर आत्मघात करून न घेतां कोठें तरी आपला काळ सुखानें घाल-वीत असतील. याबद्दल बिलकूल शंका नको. आपण उगीच काळजी करूं नये. ते जर अन्यायी नसतील तर ‘ खऱ्याचा वाली परमेश्वर ’ असतो हें आपण पक्कें समजावें. बरें उशीर झाला, आतां रात्रीं येईन. ( जाऊं लागतो. )

चंद्रकेतू—विश्वसेन, तुह्मीं या गोष्टीबद्दल बातमी निघेल तर काढा. रक्ताचें नातें आहे, तेव्हां आंतडें कळकळतें दुसरें काय ?

विश्वसेन—या गोष्टीची आपल्यापेक्षां मला जास्त काळजी आहे असें समजा. ( जातो. )

( देवडीवरील शिपाई येतो. )

चंद्रकेतू—कां रे संतू देवडीवर कोण आहे ?

संतू—जी साब मी हाय, वरदी द्यायसाठी आलूया.

चंद्रकेतू—कोण आले आहेत देवडीवर ?

संतू—बामनावानी दिसतूया. ह्मंमाला धनीसाबांची भेट ध्यायची हाइ, तवा कळवून येजा. जसा हुकूम व्हईल तसं.

चंद्रकेतू—जा त्यांना आंत लावून दे. ( शागीर्दाचा वेष घेतलेला सत्यविजय प्रवेश करितो. )

सत्यविजय—नमस्कार, यजमानसाहेब.

चंद्रकेतू—नमस्कार, या बसा असे. ( उत्थापन देतो. ) येण्याचा उद्देश काय असेल तो खुशाल कळवावा.

सत्यविजय—एक विनंति आहे. धर्म करा असें मुळींच ह्मणणें नाहीं.

चंद्रकेतू—काय विनंति आहे ती कळवा.

सत्यविजय—गजबजलेल्या घराण्यांत माझे कांहीं दिवस

नोकरींत गेल्यामुळें तशाच घराण्यांत नोकरी करावी; ह्मणून मनांत उद्देश धरून आलों आहे.

चंद्रकेतू—पूर्वी आपण कोठें नोकरी केली आहे ?

सत्यविजय—विश्वनगरांतल्या एका श्रीमंत गृहस्थाचे घरीं मी नोकरीला होतों. लिहिणें पुसणें कांहीं येत नाहीं, ह्मणून शागीर्दी करून होतों. त्यांना विपत्काल आल्यामुळें आमच्यासारखे आश्रित सहजच जिकडे तिकडे पोटाच्या पाठीमागें निघून गेले. येथें नोकरी करावी असा हेतु आहे. पगाराची अट वगैरे कांहीं नाहीं. काम पाहून मर्जीस वाटल्यास पगार द्यावा. स्वयंपाक करतां येत नाहीं. फक्त यजमान, यजमानीण व तशींच निकट संबंधाची मनुष्यें यांच्या तैनातींतील कामें करीन. येथें फक्त दिवसा राहीन. रात्रौ शयन देवालयांत, मला गाण्याचा नाद असल्यामुळें ईशभजन वगैरे करून स्वतःची कर्मणूक करून घेतों. प्रातःकाळपासून रात्रौ प्रहर रात्रीपर्यंत तुमचा बंदा नोकर; पुढें माझा मी यजमान. फक्त सोंवळ्यांतील कामें करीन. आमच्या सारख्यानीं श्रीमंतांच्या घरीं कामापुरतें असावें हें बरें; व त्यापासून उभयपक्षींही चांगलेंच. जशी मर्जी असेल तसें कळवावें,

चंद्रकेतू—( आपल्याशीं ) इतकें चोख वर्तन करणारा

नोकर मला कधींच आढळला नाहीं, कांहीं चोर असतात, कांहीं साव, कांहीं तोंडपुंजे, कांहीं ‘ हांजी हांजी ’ करणारे, बरेचसे लोभी, कित्येक पगारासाठीं आतूर, पण त्यांपैकीं ह्याच्या बोलण्यावरून व आकृतीवरून एकही दुर्गुण ह्याच्या आंगीं दिसत नाहीं; तेव्हां आपल्या पदरीं याला नोकरीला ठेवावा ( उघड ) आपलें नांव काय ?

सत्यविजय—माझें नांव विश्वास.

चंद्रकेतू—वाहवा ! नांव तरी किती रमणीय आहे. ठीक आहे, तुझ्या अटी आह्मांला कबूल आहेत; पण एक विचारतों कीं, केव्हां तरी गाणें ह्मणावयास सांगितलें तर ह्मणशील कीं नाहीं ? मला गाण्याचा शोक असल्या कारणानें गायनासंबंधीं सर्व उपकरणें माझ्यापाशीं आहेत.

सत्यविजय—श्रीमंतांनीं असले शोक करूं नयेत तर कोणी करावे ? गायन हीं तरी एक कलाच आहे. प्रत्येकानें तिचा व्यासंग करावा; मग पुरुष असो वा स्त्री असो. आपल्या मर्जीबाहेर मी जाणार नाहीं. मी कांहीं मोठासा गवई नाहीं; चार पदें वगैरे ह्मणून स्वतःची करमणूक करून घेतों झालें. कोठें जाणें नाहीं येणें नाहीं. एरवीं पान, तंबाखू, विडी वगैरे कसल्याही दुर्व्यसनाच्या फंदांत मी नाहीं, नोक-

रीलाच रहावयाचें मग खरें असेल तें स्पष्ट सांगावें; ठीक आहे तर मग आजपासून मी चाकर व आपण धनी. मला लिहावयास जर येतें तर किती नामी झालें असतें; पण नशिबीं नाहीं त्याला उपाय काय ? असो, मी सांगितलेल्या कामांपैकीं पाहिजेल तें काम सांगावें, मी करण्याला तयार आहे.

**चंद्रकेतू**–ठीक आहे, तुझ्याच अटीप्रमाणें तूं कामें कर. आजपासून आमच्या घरीं खुशाल आनंदानें आपलें कामधाम करून रहा. अग इकडे ये पाहूं. ( चंद्रकेतूची पत्नी आनंदी येते. )

**आनंदी**–कां बोलावणं झालं ?

**चंद्रकेतू**–ह्या मनुष्याला मी आपल्या घरीं आजपासून नोकरीला ठेवला आहे. फक्त सोंवळ्यांतील कामें हा करील, एरवीं कोणतेंही काम याला सांगूं नकोस. स्वयंपाक करितां येत नाहीं व वाढणार नाहीं; फक्त देवपुजेकडील व तुमचीं सोंवळींओंवळीं वगैरे व्यवस्थेनें ठेवणें, इतकीं कामें ह्याच्याकडून करवून घेतजा.

**आनंदी**–पुष्कळ मेले शागीर्द आहेत, मग हा आणखी कशाला ठेवणं झालं नकळे.

**चंद्रकेतू**–तुला काय त्याचें, सांगितलेलें ऐकावयाचें आणि स्वस्थ रहावयाचें, जशीं पदरीं पांच-पन्नास माणसें आहेत तसा हाही एकवन्नावा. याचें नांव विश्वास.

जा इच्या बरोबर घरांत. सायंकाळच्या पुजेची तयारी कर. सामानसुमान काय लागेल तें इच्यापाशीं मागत जा.

( सर्व जातात. )

## प्रवेश ३ रा.

( मनोरमा व तिची सखी प्रवेश करितात. )

**सगुणी**—ताईसाहेब, आज महिना पंधरा दिवस झाले. आपलं चित्त कांहीं स्वस्थ दिसत नाहीं, वेळेवर अन्न खायचं नाहीं, झोंप घ्यायची नाहीं, झोपेंत कांहीं तरी बरळायचं, हें काय? नेहमीं कावरल्या बावरल्यासारख्या दिसता, कोणाशीं नीट बोलत नाहीं, चालत नाहीं, असं कां? मला सांगा. सासरचं पत्रबित्र कांहीं आलं नाहीं ह्मणून तर असं नाहींना करीत? त्यांना पत्र धाडायला काय होतं कोण जाणे. महिन्या पंधरा दिवसांनीं एखादं पत्र पाठविलं ह्मणजे मनुष्य इतकी काळजी करीत नसतं.

**मनोरमा**—काय सांगूं तुला सगुणे, हा स्त्रियांचा जन्मच मेला खोटा. नेहमीं आपलं परतंत्रांत रहावं नि एखादे दिवशीं मरून जावं. जन्माला आल्या काय नि गेल्या काय, दोन्हीं सारखींच. परवां बाबा आईपाशीं तिकडचं पत्र आलं आहे ह्मणून सांगत होते,

त्यांत तिकडे घरांतून मामंजींनीं घालवून दिलं, हीं अक्षरें माझ्या कानीं पडल्यापासून मला कांहीं नकोसं वाटतं !

**सगुणी**—( घाबरून ) काय ह्मणतां ताईसाहेब, यजमानांना घरांतून घालविलं? अग बाई ! मेलं जितकं ऐकावं तितकं थोडंच. तें काय ह्मणून ताईसाहेब?

**मनोरमा**—काय ह्मणून तें मी ऐकलं नाहीं. कांहींच तर्क चालत नाहीं. काय असेल तें परमेश्वराला माहीत.

**सगुणी**—भलता सलता कांहीं छंद नव्हताना?

**मनोरमा**—इश्श, हेंग काय तुझं बोलणं सगुणे?

**सगुणी**—ताईसाहेब, सगळ्यांत नाशाला कारण दुर्व्यसन होतं. ह्मणून मी आपलं सहज विचारलं. कोणाकोणाला पंचपक्वानं मिळालीं तरी थालिपीठ लागतं. आमच्यांची नाहीं कां स्थिति पाहिली ! सदा आपलं आळणी पथ्य. तो मेला सांजा करावयाचा आज सहा सात महिने पाठीं लागला आहे. कधीं कपाळचा त्रास चुकेल तो चुको. पुरुष कसे पतंगासारखे असतात. पतंगाला जसं दिव्याचं फूल दिसतं, तशा ह्यांना परस्त्रिया वाटतात. माझ्या बोलण्याचा राग मानूं नका, अनुभवसिद्ध गोष्ट सांगतें.

**मनोरमा**—माझ्या दृष्टीला कांहीं असलं घाणेरडं आच-

रण पडलं नाहीं. आतां एवढं बरीक खरं कीं, हौस आणि धार्मिकपणा, ह्यांच्या पायीं मामंजींनीं घरांतून घालवून दिलें असेल तर नकळे; एऱ्हवीं कोणतंही व्यसन नव्हतं. विडा खायचा, तो तरी केव्हां, रात्रौ एकदां किंवा दोनदां, तो तरी किती आळे पिळे घेऊन. तूर्त आपल्या कपाळीं दुःख आलं खरं !

**सगुणी**—ताईसाहेब, असं होऊन दिवस तरी किती झाले ?

**मनोरमा**—पत्र आलं यावरून वाटतं कीं, निदान पांच सहा महिने तरी झाले असावेत; नाहीं तर महिन्यांतून एक तरी पत्र पाठविणं व्हावयाचंच.

**सगुणी**—मग एवढ्या करत्यासवरत्या पुरुषाला वडिलानीं घरांतून घालवून देण्याजोगं असलं कसलं मोठं कारण ?

**मनोरमा**—अग, आमच्या मामंजींना कारणावांचून एक पै खर्च करणं ह्मणजे जिवावर येतं. तिकडचा स्वभाव उदार असल्यामुळं भिडेखातर दिले असतील कोणाला पैसे. ते ह्यांना नसेल खपलं, ह्मणून जमदग्नीनीं संतापानें असें केलं असेल यांत संशय सुद्धां नको.

**सगुणी**—इतकी कां मेली यांची घरांत सत्ता नाहीं ? बरोबरीचा मुलगा झाल्यावर वडिलांनीं आपला मान

आपण राखून घेण्यांतच जास्त भूषण आहे. करायचा काय तो मेला इतका पैसा ! मेल्यावर जिथल्या तिथंच रहावयाचा. एकेक असे चेंगट असतात कीं, पोटाला पोटभर अन्न नि आंगभर वस्त्र हें देखील घेण्याला खालींवर जीव होतो. तुमचे मामंजी मला तर बाई तसेच दिसले. मी आपल्याला पाठराखणी एकदां आलें होतें, त्या वेळीं बारीक रीतीनें सगळं माझ्या ध्यानांत आलं.

( इतक्यांत स० विश्वास सोंवळ्यानीं प्रवेश करितो. )

**वि०**–( गडबडीनें ) अहो ! बाबासाहेबांची पूजा आटपली, जेवायला नाहींका चलायचें? वेळेवर खाल्लें ह्म० पित्त शमन होतें.

**मनोरमा**–वैश्वदेव वगैरे सर्व आटपला का ?

**विश्वास**–हो. पानें देखील वाढलीं, फक्त भाताच्या मुदा वाढावयाच्या राहिल्या आहेत. काकीसाहेबांनीं सांगितलें ह्मणून बोलवावयाला आलों. ( जातो. )

**मनोरमा**–( आपल्याशीं ) या पुरुषाला पाहिलं कीं आंगावर रोमांच उभे राहून घामानं डवडवून जातें ! केव्हांही पहा, समोर आला आहे आणखी दोन शब्द बोलला आहे असं नाहीं, आल्यापासून ह्याचा आपला एकच कित्ता. ( उघड ) सगुणे, कोणापाशीं बोलणार नाहींस तर सांगतें.

**सगुणी**–आपण मला अशीचका समजतां ? सांगा काय

तें, माझ्या हातून होण्याजोगं असेल तर पाय मागं घेणार नाहीं.

**मनोरमा**–माझ्या गळ्याची शपथ वाहशील तर सांगतें.

**सगुणी**–शपथ हो कशाला ? ( गळ्यावर हात ठेऊन ) तुमच्या गळ्याची शपथ, एक अक्षर सुद्धां काढणार नाहीं. मात्र माझ्यापाशीं चोरून ठेवूं नका.

**मनोरमा**–गडे, हें मन किती चंचल आहे ह्मणून सांगूं ? ह्या पुरुषाला पाहिलं कीं लागलीच चलबिचल होतं. नशिबाचा फुटका ह्मणून शागीर्द झाला; नाहीं तर राजपदावर बसला असता, तरी शोभला असता.

**सगुणी**–" गोरागोमटा आणखी कपाळकरंटा " घड घांरत त्याचा पाय टिकेल तरना ? या पुरषावरका आपलं मन गेलं आहे ? हाच्याच्या मग काळजी कशाला करतां ?

**मनोरमा**–( लाजते. )

**सगुणी**–लाजूं नका. मैत्रिणीचं दुःख मैत्रिणीकडूनच हलकं होतं. आपण कामगिरी मात्र सांगा कीं बजावलीच समजा.

**मनोरमा**–( लाजेनें. )

**पद.** ( जलांतरी प्रियास० या चालीवर. )

**तिळ तिळ तुटे जीव सदा चैन नच पडे ॥**
**मत्प्रेमा या पुरुषावरति कां जडे ॥**

अनंग दांडगा मदंग जाळितो गडे ॥
सुंदरा विलोकितांच कोसळे रडें ॥ १ ॥

( विव्हल होते. )

**सगुणी**—इतकंचना. जेवण झाल्यावर या गोष्टीचा छडा काढून घेऊन जर आपली नि त्याची गांठ न पाडीन तर नांवाची सगुणीच नव्हे.

( दोघी जातात. )

---

## प्रवेश ४ था.

—◎✻◎—

**( घरांतील एक सोपा )**

( सत्यविजय गीता वाचीत इकडे तिकडे फिरत आहे, इतक्यांत सगुणी प्रवेश करिते. )

**सगुणी**—( आपल्याशीं ) विश्वासाच्या एकंदर वर्तनावरून मी करणाऱ्यां प्रश्नांचीं उत्तरं हा बरोबर देईल असं मला तर वाटत नाहीं. कारण ह्याचं वैराग्यशील वर्तन आल्या दिवसापासून आजपर्यंत आहे तसं आहे, ताईसाहेबांकरितां खडे टाकून पाहतें, एखादा लागला तर पहावं.

सत्यविजय–( आपल्याशीं ) माझ्या मनोदयाप्रमाणें आतां मात्र कांहीं घडून येण्याचा रंग दिसत आहे. खरोखर 'जोरू साथ' ही साधूची वाणी यथार्थ आहे. आलीकडे मला पाहिल्याबरोबर माझी स्त्री जे सुस्कारे टाकिते आणि माझ्याकडे प्रेमयुक्त व सलज्ज पाहून किंचित गालांतल्या गालांत हंसते यावरून माझी मूर्ती तिच्या नेत्रांत बरीच बिंबू लागली आहे. ( रागानें, दांत ओठ चावून ) ह्या कुलटा एकदां उलटल्या कीं, ब्रह्मदेवाच्यानेही ह्यांचें मन फिरवणार नाहीं. आतांशा बरेच दिवस मी तिच्या लुगड्याच्या चुण्या करूं लागलों कीं, घातलीच तिनें कपाळाला अठी. मग काय तिच्या मनांत आहे नकळे.

सगुणी–बोलतेच आतां याच्याशीं. 'सूतउवाच' केल्या-खेरीज पुराण सुरू व्हायचं नाहीं. विश्वासबुवा, अहो, काम करून दमतां, तेव्हां थोडकीशी दोन-प्रहरीं डुलकी कां घेत नाहीं ?

विश्वास–काय ह्मणतां सगुणाताई आपण ?

सगुणी–काम करून दमतां, तेव्हां ह्मटलं थोडकीशी झोंप कां घेत नाहीं ?

विश्वास–ह्मातार्‍यांनीं अगर श्रीमंत लोकांनीं वामकुक्षी

करावी, आह्मीं दिवसा जर निजलों, तर एक आळसानें कामें न होतां सुस्तपणा वाढतो; शिवाय रात्रीं झोंप येत नाहीं. रात्रौ जागरण झालें कीं, पहाटे उठूं नयेसें वाटतें. प्रवासांत मनुष्यानें आहार आणि निद्रा बेताची करावी. आतां जर आह्मीं आळशी झालों, तर वृद्धपणीं मग भीक का मागायची? तरुणपणीं कष्ट करून ह्मातारपणीं सुखानें राम राम ह्मणत बसणाऱ्याला यावेळींच श्रम केले पाहिजेत.

गुणी—बायको ना पोर, एकल्याचंहो काय, कुठंही पडलं नि कुठंही उठलं. सध्या तर सुख घ्यावं; पुढचं कोणी पाहिलंय? कायहो विश्वासबुवा, तुह्मी लग्नहो कां केलं नाहीं?

विश्वास—आह्मा फटिंगाला कोण लेक आपली मुलगी देतो? पण कांहो, तुह्मी मला बोवा ह्मणून हाक मारतां, तो का मी हरदास, का पुराणीक?

गुणी—अहो, कुणालाही मोठेपणानं हाक मारायला आपलंहो काय जातं? शिवाय, त्या मोतीबागेंतल्या सांबाच्या देवळांत, तुह्मीं केव्हां केव्हां ताना मारता, ह्मणून बोवा ह्मटलं. बरं पण आपण हें ब्रह्मचर्य किती दिवस पाळणार?

विश्वास—ह्मातारा होईपर्यंत, पुढें आपोआप ब्रह्मचर्य येतेंच.

**सगुणी**–तरुणपणाची बेडी तोडून पार पडल्यावर मग म्हातारपण पहाणारना? अवकाश आहे.

**विश्वास**–बेडी असेल तर तुटेल कीं नाहीं?

**सगुणी**–बेडी नसायलाहो काय झालं, जवळच आहे. हूँ म्हणणारे पाहिजेत कीं बेड्यांनाहो काय तोटा.

**विश्वास**–( आपल्याशीं ) आतां जरासा मनोनिग्रह सोडून हिच्या तोंडाला पाणी सुटायला लावलं पाहिजे. ( उघड ) आह्मा वेड्यांला कोण घालतो बेडी?

**सगुणी**–तुह्मी कसचे वेडे! दुसऱ्या मात्र तुमच्याकरितां वेड्या होत चालल्या आहेत.

**विश्वास**–हें तुह्मीं आपलें कांहीं तरी बोलत आहां झालें. खुळ्या असतील, त्याच वेड्या होतात. हें पहा, तुह्मी व मी बोलत उभे राहिलों आहों, असें जर तुझ्या यजमानणीनें पाहिलें तर तिला राग येईल. उगीच पंचाईत नको.

**सगुणी**–( हळूच ) हें पहा, ती माझी यजमानीण असें न म्हणतां, आपलीच म्हणा म्हणजे सोन्याहून पिवळं होईल. शिवाय तुमच्याविषयीं आतां कोणालाच संशय येणार नाहीं. बाबासाहेब आपली किती वाखाणणी करतात म्हणून सांगूं.

**विश्वास**–अग खुळे, तूं शुद्धीवर आहेसका? हें पहा, श्रीमंतांच्या घरीं आपलें बेताबातानें असलेलें बरें.

जर का हें कोणाला कळलें, तर माझें हाड देखील रणार नाहीं.

गुणी—तुमच्या केंसाला धक्का लागेल तर तें जोखीम माझ्याकडं, पुरे करा आतां ती गीता. दुसऱ्याचं पित्त खवळेपर्यंत वाचता कशाला ती गीता. यां तुम्ही माझ्याबरोबर बुद्धिबळं, गंजिफा कांहीं तरी खेळूं चला. आतां जिकडे तिकडे अगदीं सामसूम आहे.

श्वास—तें कांहीं मला खेळतां येत नाहीं. फक्त सोंगट्या थोड्याशा खेळायला येतात.

गुणी—सोंगट्या कां होईनात, कांहीं तरी खेळा म्हणजे झालं

श्वास—तूं पुढें जा. मी येतों इतक्यांत ( सगुणी आनंदानें जाते ) ( रागानें ) अग कुटणे, बरीच यजमानणीची कामगिरी बजावलीस. ठीक आहे मीही पण खरपूस समाचार घेतों.

( जातो )

---

## प्रवेश ५ वा.

—◎✕◎—

**स्थळ—मनोरमेचा महाल.**

( सगुणी व मनोरमा प्रवेश करतात. )

ोरमा—( उत्सुकतेनें ) आशा का निराशा तें आधीं सांग ?

**सगुणी**–( आनंदानें ) निराशा कां ? आशा, आतां येईल पहा विश्वास.

**मनोरमा**–( सुस्कारा टाकून ) विश्वासाचा गैरविश्वास न होवो ह्मणजे झालें.

**सगुणी**–हें पहा, पक्का विश्वास तुमच्या मनांत असला कीं विश्वास आहेच समजा. ( विश्वास आला असें पाहून ) बाईसाहेब तो आला पहा. मी जातें आतां अँ. एकदाचं स्वयंवर झालं कीं कृतकृत्य झालें. ( विश्वासाजवळ जाऊन ) विश्वासबोवा, कांहीं काळजी करूं नका. मी कोणी येईल तर असतें पहाऱ्यावर. ( जाते. ) ( मनोरमा विश्वासालां वस्त्रालंकार देते. )

**मनोरमा**–( विश्वासाला उद्देशून विनयानें ) विश्वासराव, आटपलंका कामधाम.

**विश्वास**–आतांसाच कामाधामांत आलों. तुह्मीं मला राव ह्मणूं नका.

**मनोरमा**–रावाच्या उलट ह्मणूं ?

**विश्वास**–तुह्मीं बोलण्यांत मोठ्या हुशार दिसताहो. आह्मा गरिबांना हे डावपेंच समजत नाहींत.

**मनोरमा**–श्रीमंत होण्याची आशा मात्र धरली पाहिजे. ( इकडे तिकडे पाहून ) हें पहा, आजपर्यंत पुष्कळ दम धरला; आतां अगदीं निर्लज्ज होऊन सांगते.

**विश्वास**–काय सांगणार ?

मनोरमा-

पद. ( मोदीसिकां० या चालीवर. )

सुरम्य-मंदिरीं सुखास घेऊं प्रियकरा ॥
करून तृप्त टाकि रे रतीस तूं स्मरा ॥
अशा वयामध्यें करून चैन घे नरा ॥
यौवनीं नको मनांत बाळगूं दरा ॥
जरी न अंगिकारिसी विनंती सुंदरा ॥
चिरून घेत ही गळा प्रिया चराचरा ॥ १ ॥

विश्वास-( मुद्दाम घाबरल्यासारखें करून ) जीभ आटपून धरा, आपण ह्मणतां तरी काय हें? हें पहा बरोबरीचें नातें पहावें, आणखीं मग प्रीति करावी. खरेंच सांगूं—

पद. ( मी कुमार ती कुमारी० या चालीवर. )

मी गरीब तूं थोराची ॥ अससीगे युवती
साची ॥ कलहंसी वायस यांची ॥ नच
जमे जोडि गमतीची ॥ तूं सेव्यसेवकभावा ॥
विसरूनी स्नेह न करावा ॥ परिणामीं होईल
दावा ॥ गे तुला शपथ तव पतीची ॥ हा कुमार्ग
सोडुनि देईं ॥ नच वाट धरीं नरकाची ॥ १ ॥

मनोरमा-

पद. ( चाल सदर. )

तातानें ज्याला दिधलें ॥ त्यानें कां मजसी
त्यजिलें ॥ ह्मणुनी मी तुजसी वरिलें ॥

स्वमतानें मन वाहिलें ॥ कामधाम करुनी सखया ॥ झिजवीसी तनु कां वायां ॥ मानुनी मला घे जाया ॥ मदनानें मजला छळिलें ॥ अजवरी तुझ्या नादानें ॥ प्रिय सखया वेडी बनलें ॥ १ ॥

हें पहा,–

पद. ( रासियाचे० या चालीवर. )

रतिविलास गंगेमाझारीं ॥ करि विहार नौकानारी ॥ किती असे सुनिर्मळ वारी ॥ जलविहार करी सुखकारी ॥ सुखविलास भोगुन मंदिरीं ॥ घे मजा तवांकित नारी ॥ १ ॥

विश्वास—

पद. ( मनास या जिनें पहा० या चालीवर. )

करोनिया विवेक पूर्ण अंगने मनीं ॥ योग्यता बघून स्नेह तूं करी जनीं ॥ असे जिवंत जोंवरी प्रिये तुझा धनी ॥ तोंवरी तया न देई नरकि लोटुनी ॥ १ ॥

मनोरमा–जिवंत आहे का मेला कुणाला ठाऊक ?

विश्वास–( आपल्यशीं एकीकडे ) कुलटे, काय करूं ! नाइलाज आहे. नाहींपेक्षां आतांच नरडीचा घोट घेतला असता. ( उघड ) अग त्याचें कांहीं जरी झालें असलें, तरी तूं व्रतस्थ रहाणें, हें तुला योग्य आहे.

मनोरमा–योग्य खरं, पण—

पद. ( फुलें वेलीचीं० या चालीवर. )

कटीं लंगोटा ॥ घेउनी भिकेचा लोटा ॥ धृ० ॥
असेल भूवरी भडकत आतां ॥ किती करावी
त्याची चिंता ॥ धीर न धरवे किमपि
चित्ता ॥ असे कीं मोठा ॥ स्त्रीजन्म जगीं
या खोटा ॥ १ ॥

विश्वास–मी तुला सांगतों त्याचा राग नाहींना येणार ?

पद. ( चाल सदर )

पतिची सत्ता ॥ तुजवरी असोनी लत्ता ॥
देसी ज्यापरि त्याला आतां ॥ त्याहुनि
पुढती मजला देता ॥ स्थीरता नसे युवती
चित्ता ॥ रुचेल त्याला प्राण अर्पिता ॥
विसरुनि कांता ॥ सेविसी कशी गे दुरिता ॥१॥

मनोरमा–सर्व कांहीं माझा तूं आहेस. ह्मणशील तर आज तुझ्याबरोबर नेशील तिकडे दागदागिन्यांसह येते. खुशाल चैनीनें एके जागीं राहूं. कितीरे तूं पापभीरू आहेस ?

पद ( करोनिया विवक० या चालीवर. )

मुळीं दया कशी नये अजून सुंदरा ॥ तुझ्या-
विणें गती मला न सगुण मंदिरा ॥ नयनिं
पूर्ण बिंबला अमोल्य जो हिरा ॥ तया-
विणें नसे मला कुठेंच आसरा ॥ १ ॥

विश्वास—

पद. ( गुलनार मोतिया० या चालीवर. )

लावुनी परिस लोहाला ॥ निष्पन्न करी हे-
माला ॥ सुममधु असे मधुपाला ॥ योग्य
गे नसे उरगाला ॥ मग लावि रती कामाला
रमवाया या कामाला ॥ चाल ॥ हा मार
देह दुर्गाला ॥ भेदील घालुनी घाला ॥
संभाळ बरें कामाला ॥ छातींत मारुनी
लाथ । करिल हा घात । मनस्तंभाला ॥
बांधुनी टाक तूं याला ॥ १ ॥

अग, सोयरा करावा तर पलंगाचा, आणि चोरी करावी तर जन्माची.

मनोरमा—माझंही ह्मणणं तेंच आहे. चाहील तें खा, पी, स्वस्थ ऐस; कुणाला न कळत तुझीं सर्व कामं मी करीन. पण मी सांगतें तें ऐक.

पद. ( मम आप्त बंधु बांधवा० या चालीवर. )

अमृता टाकुनी असें ॥ गरल तुज कसें ॥ नरा
रूचतें ॥ हें कसें तुजसि नच कळतें ॥ धृ० ॥
याजनीं । सुखाच्या खनी । तरुण कामिनी ।
असोनीया ॥ यौवना दवडिसी वाया ॥ १ ॥
तूं वरवर दिससी शांत । परि न मज अंत ।
देसि अजुनी ॥ दमले मी समजुत करुनी ॥२॥

हा मदन-बाण । मत्प्राण । करी हैराण । प्रिया
चित्ता ॥ मुळि धीर न धरवे आतां ॥ ३ ॥
( जवळ जाऊन ) प्रिया. हा प्राण तुजवर ओंवाळून टाकला आहे, याची पाहिजेल ती विल्हेवाट कर. ( आलिंगन देण्याला जाते. )

विश्वास—

पद. ( चाल—सदर. )

अवदसे । लागलें पिसें । तुजसि हें कसें ।
नुमजतें अजुनी ॥ किति अघटित ही तव
करणी ॥ धृ० ॥ श्रीमंत । वधू कुलवंत ।
क्वचित गुणवंत । निपजतें जगतीं ॥ जे असें
वदाति ते सुमती ॥ १ ॥ हा मार । असेंगे
जार । करुनि बेजार । टाकितो सर्वां ॥ परि
शुकें जिंकिलें गर्वा ॥ २ ॥ वासना । न-
सोनी मना । करिसि चेतना । दुर्मती
युवती ॥ जा येथून हो चालती ॥ ३ ॥

मनोरमा—( विनयानें जवळ जाऊन )

पद ( हृदय पहा काळजिनें० या चालीवर. )

केतकिचा वास करी धुंद सदा नागिणीला ॥
सहवासा करुनि सुखें घे पदरीं तूं मजला ॥
स्वाती घनजलबिंदू तृप्त करी चातकिला ॥
त्यापरी तूं शांतविरे मनरमणा ही अबला ॥ १ ॥

विश्वास—

पद. ( किती चपल हरिण० या चालीवर. )

किति कुमति असति या अबला ॥ प्रबला
कारिती निर्बल केवळ नराहुनीया असती
सबला ॥ धृ० ॥ उच्छृंखल या झाल्या
वरती ॥ कोणा कालत्रयिं नावरती॥ अनंग-
रंगापुढती नातें विसरूनि भाना जाती
कुटिला ॥ १ ॥

मनोरमा—हें पहा, ज्याला मी हें मन वाहिलें तोच माझा पती. प्रिया, आतां मात्र माझ्यानं धीर धरवत नाहीं. ( असें ह्मणून विश्वासाला मिठी मारिते. )

विश्वास—( रागानें तिला एकीकडे लोटून )

श्लोक. ( शार्दूलविक्रीडित. )

दुष्टे प्रेम तुझें पुरे मजसि हें हो येथूनी चालती ॥
गेला प्राण जरी तरी न मजला भीती तुझी
दुर्मती ॥ ज्यासी स्वीकृति जाहली तव खरी
त्याला न तूं जाणसी ॥ ऐशा जारिणिची
नको पुनरपी दुःसंगती ती मसी ॥ १ ॥

मनोरमा—( रागानें ) अरे अधमा, शेवटीं आपला हट्ट शेवटाला नेलासना ? कपाळकरंट्या भोग आतां आपल्या कर्माचीं फळं. आतां येथून जिवंत सुट-ण्याची आशाच सोड. थांब आतां बाबा-

साहेबाकडे जाऊन तुझी हड्डी नरम करिवतें. ( जाऊं लागते इतक्यांत. )

विश्वास–( अतिशय संतापून ) चांडाळणी, अशी पाताळयंत्री मसलत करण्याला तुला जिवंत ठेवीन तेंव्हांना ? ( चवताळून आंगावर जाऊन. )

पद. ( अंजनपर्वा॰ या चालीवर. )

फोडुनि वदना । पाडुनि रदना । मेदिनी-
वरती आपटोनी ॥ पंचप्राणा । हरुनी जाणा ।
पाठवितो तुज यमसदनीं ॥ कोपविकोपा
चढला आतां ॥ दम धरवेना किमपि मनीं ॥
दुष्ट अंगना । प्राशुनि अशना । टाकितों
स्वयें शमवोनीं ॥ १ ॥

( असें ह्मणून तिची वेणी धरून खालीं पाडतो. )

[म]नोरमा–( विव्हल होऊन घाबरेपणानें. )

पद. ( चाल–वसंत, ताल–दादरा. )

बलात्कार हा कठोर मजवरी करी ॥
धांवाहो कोणी तरी शत्रुसंहरी ॥
युवति धेनु सांपडली खाटिका करीं ॥
अजुनि कशी नायकती दीन वैखरी ॥ १ ॥

( सगुणी आंत विपरीत प्रकार कांहीं तरी झाला ह्मणून पडद्यांतून, अहो बाबासाहेब, अहो बाबासाहेब ! असें मोठ्यानें ओरडते व धांवत येते. )

विश्वास–( संतापानें लाल होऊन )

पद. ( अमृताचे कलश० या चालीवर. )

कोण येतो तो पहातों मजसि माराया ॥
प्राण त्याचा प्रथम घेतो कोप शमवाया ॥
युवति कुंकुमतिलक पुसुनी पुढति नंतर या ॥
शुद्धबीजांकूर नर या सिद्ध झाला या ॥
नातरी करकंकणानें शोभवोनी या ॥ १ ॥

सगुणी–बाबासाहेब ! आपल्या ताईसाहेबावर त्या मेल्या विश्‍ठ्यानं बलात्कार केला ! धांवाहो धावा !

चंद्रकेतु–( पडद्यांत रागानें ओरडून ) काय ह्मणतेस, मनोरमेवर बलात्कार ! कोठें आहे तो विश्‍ठ्या ! ( त्याला पाहून ) अरे पहातां काय ? ( क्रोधानें )

पद. ( अंजनपर्वा० या चालीवर. )

मारा । हाणा । ठोका । चोपा । झडकरी याला ठार करा ॥ तुकडे तुकडे करुनी टाका ॥ सत्वर धाडा काळघरा ॥ चेंदा । मेंदा । करुनी रेंदा ॥ नीच प्राणा हरण करा ॥ हराम-खोरा छाटून टाका ॥ पाठवुनी द्या यम-नगरा ॥ १ ॥

( सर्व लोक विश्वासाच्या आंगांवर लांडग्यासारखे चवताळून जातात. )

चंद्रकेतू–( रागानें ) नीचा ! आजपर्यंत खाल्लेल्या अन्नाची अशा प्रकारची कृति करून सार्थक केलेंसना ?

**विश्वास**—अलबत. अद्यापपर्यंत तरी अन्नाचें सार्थक केलें आहे. काय प्रकार झाला, हा ईश्वराच्या दरबारीं रुजूं असेल.

**चंद्रकेतू**—आतां ईश्वर राहिला देव्हाऱ्यांत. या मृत्यु-लोकच्या यमाच्या दाढेंतून सुटशील, तेव्हां ईश-दरबारीं जाशील. हरामखोरा ! खुद्द माझ्या सुशील कन्येवर बलात्कार केलास अँ ?

**विश्वास**—

श्लोक.

**कशाला अशा जन्मलासी सुतेला ॥ दिली**
**कां न भक्षावयाला चितेला ॥ कुमार्गी**
**अशी पोरटी सत्कुलाला ॥ खरी जन्मली**
**डाग लावावयाला ॥ १ ॥**

( इतक्यांत रागानें आनंदी प्रवेश करते. )

**आनंदी**—पहातां काय भागूबाई सारखे; ठार करा मेल्याला आधीं. केवढं मेल्यानं दंभ माजविलें पण !

**विश्वास**—चप्प, 'खाण तशी माती.' खबरदार मेल्या-बिल्या ह्मणशील तर.

**मनोरमा**—( रागानें ) मेल्याचे डोळे काढा अगोदर बाहेर, आणखीं मग ठार करा.

**विश्वास**—अग जारिणी, थोडक्यांतच चुकलें, नाहीं तर मुडदाच पाडीत होतों.

चंद्रकेतू–( रागानें ) विश्वप्रिया, पहातां काय? न्यायाला, मांगाच्या स्वाधीन करून अरण्यांत नेऊन ठार मारायला सांगा.

पद.

मारा । हाणा। ठोका । चोपा । झडकरि
याला ठार करा ॥ तुकडे तुकडे करुनी
टाका ॥ सत्वर धाडा कालघरा ॥ चेंदा ।
मेंदा । करूनी रेंदा ॥ नीचप्राणा हरण
करा ॥ हरामखोरा छाटुन टाका ॥ पाठ-
वोनि द्या यमनगरा ॥ १ ॥

( असें ह्मणत विश्वासाला बांधून सर्व घेऊन जातात. )

( पडदा पडतो. )

---



# अंक ४ था.

## प्रवेश १ ला.

स्थळ—अरण्य.

( चांडाळ विश्वासाला घेऊन प्रवेश करितात. )

**मरग्या**—गेन्या, अरे वेळ अतिशय होऊन गेला. या पुरुषाचा वध करून रातोरात आपल्याला परत घरीं गेलें पाहिजे. आज मरीआईची जत्रा आहे, तेव्हां गेल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

**गेनू**—खरेरे खरें; आपण जत्रेला हजर न झालों, तर तिचा आपल्यावर कोप होईल. यासाठीं आपली तलवार पाजळून तयार हो. विश्वासा, तुला कंठस्नान घालून तुझी आत्मज्योत आह्मीं जगांतून मालविणार, यासाठीं तुला मरणाला तयार झालें पाहिजे.

**विश्वास**-( गंभीरतेनें ) चांडाळांनों मरणाची भीति मला मुळींच वाटत नाहीं. कारण, जगांत जितकें ह्मणून दृश्य आहे, तितक्यांचा लय हा आहेच. आतां मला मृत्यु आला आहे, तसा तुह्मांलाही येणार आहेच. रोगानें खितपत पडण्यापेक्षां, शस्त्रानें एकदम मरणें फार चांगलें. नाहींपेक्षां, आशेंत हा प्राण घोटाळून घोटाळून मग हाल होणें, हें पुढील

जन्माच्या दुःखाचें द्योतकच होय. अरे जे मृत्यूला भितात, ते अगदीं मूर्ख. कारण—

पद. ( जाउनि झडकरि० या चालीवर. )

**मृत्यूवांचुनि जन्म नये ॥ जन्मावांचुनि मृत्यु नये ॥ हा फेरा करिल दरा ॥ त्यासचि येइल कालभयें ॥ धृ० ॥ गौरिहरा । दुःखहरा । निस्सारा । संसारा । निशिदिनिं चुकविशी तूंचि दये ॥ १ ॥**

**मरग्या**–( आश्चर्य पावून ) ग्येन्या, आजपर्यंत नाहीं तरी आपल्या हातून पांचपंचवीस नर बली पडले, पण याच्याप्रमाणें प्राणावर उदार झालेला असा एकही पुरुष आपल्याला आढळला नाहीं.

**ग्येनू**–असे पुरुष जगांत सांपडणें विरळा, ह्मणूनच याच्या तोंडावर दुःखाचें चिन्ह दिसत नाहीं.

**विश्वास**–मृत्यूबद्दल मला मुळींच वाईट वाटत नाहीं; पण या जगांत जिच्या पोटीं जन्म घेतला, तिचें दर्शन होण्याची आशा नाहीं, याबद्दल अतिशय वाईट वाटतें. कारण, खरें ह्मणून जें कांहीं जगांत आहे तें मातृदैवत, तें दृष्टीला पडले असतें, ह्मणजे आशा राहिली नसती. आशा नाहीं ह्मणजे पुन्हां जन्मही नाहीं. असो, बा मृत्यो—

पद. ( मित्रा स्वर्गसुखा एकाकीं० या चालीवर. )

**मृत्यो नेइ मला सौख्यानें सत्कीर्ती वरुनी ॥ ना तरी पहा जन्मा येउनी॥ व्यर्थ शिणविली**

माउली जननी ॥ धृ० ॥ सत्य रविचा लोप
होउनी ॥ गेला गमतो त्रयभुवनांतुनी ॥
अन्यायाचा कळस होउनी दुर्दैवानें पडलों
व्यसनीं ॥ १ ॥

मरग्या—अरे, हा ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगतां सांगतां दुःख करूं लागला. बाबा! "सबसे जीव प्यारा" आहे. तूं किती जरी मनाचा निश्चय केलास, तरी जीव नकोसा होईल का?

विश्वास—असें जर आहे, तर मग—

पद. (अवचित ती पाठिमागें० या चालीवर.)

धनलोभापुढति तुह्मीं भूतदया कां त्यजिता? ॥
दुष्टमती धरुनि मनीं कंठ कशाला चिरिता? ॥
नरकाया पुनरपि ही येइल कां रे पतिता? ॥
नाहीं दया लेशभरी हृदयीं त्या मित्रसुता ॥
घालिल नरकांत तुह्मां सेवुं नका रे दुरिता ॥
लोभ न दे अंति गती शांति सुखा कां
मुकता ॥ १ ॥

अरे, मला जिवाची पर्वा मुळींच नाहीं. पण माझ्या जननीचें मला स्मरण झाल्यामुळें हृदयांत दुःखाग्नि भडकून गेला आहे. अहाहा!

पद. (कर्नाटकी चालीवर.)

जननी तदोपकाति ॥ फेडूं कोठें ॥ मुकलों
तुजसि सती ॥ पाहूं कोठें ॥ बालपणीं मग

लालनपालन केलेंसी तूं जननी सुमती ॥ ध्रु० ॥
जातो यमसदनीं ॥ तुज सोडोनी ॥ वंदन तुज
करितों ॥ ह्मणुनी जननी ॥ वदनीं घालुन
दुग्धामृत तूं वाढविलेंसी गे मज जगतीं ॥ १ ॥

मरग्या—ग्येन्या, वेळ होत चालला, आलेला आवेश ह्याच्या दुःखाच्या विलापानीं नाहींसा होईल. यासाठीं विलंब न करतां एकदम छाटून टाकला पाहिजे. ( रागानें ) विश्वासा, आटप लौकर. तुझा मृत्युसमय समीप आला. यासाठीं, कोणाचं स्मरण कर्तव्य असेल तर करून घे. कांहीं खायचं असेल तर खाऊन घे. आतां मुदतीपेक्षां जास्त वेळ होत चालला, तर आटप लौकर. ग्येन्या, तूं मुंडकं उडवितोस का मी उडवूं. बोल लौकर, ज्याचा दाम घेतला त्याचं काम चोख बजावलं पाहिजे. हँ आटपरे लौकर.

विश्वास—( आठवण केल्यासारखें करून ) बाबांनो, तुह्मींच सांगितलेंत ह्मणून अखेरचें कांहीं खाऊन मग ताजातवाना झालों कीं एकदम छाटून टाका; पण एक इच्छा आहे.

मरग्या—काय ह्मणतोस ? इच्छा. मृत्यूशिवाय आमचेपासून तुला कांहीं मिळणार नाहीं.

विश्वास—एवढेंच तुह्मांला सांगतों कीं, माझ्याबरोबर तुह्मींही कांहीं खाल्लें पाहिजे. तुह्मींही चालण्यानें

दमलां आहात, व मीही दमलों आहें. यासाठीं आपण सर्व हुशार झालों कीं, तुह्मांलाही माझें शिरकमल एकदम उंसाच्या वाढ्याप्रमाणें उडविण्याला जोर येईल. व मलाही तुमच्या शस्त्राखालीं मान देण्याला जोर येईल. कसें काय ऐकणारना माझी विनंति ?

**मरग्या**—तूं आह्मांला लांच देऊन आमचें मन वळवूं पहातोस होय ? अशा गोष्टीनें आह्मीं वळणार नाहीं. ज्याचें अन्न खाऊं त्याला मारायला देखील आह्मीं कधींही मागें पुढें पाहणार नाहीं, हा आमचा जातीधर्मच आहे. कसेरे ग्येन्या ?

**ग्येन्या**—देईना बापडा खायाला. तुझें काय जातें. विश्वासा, आण काय देतोस तें.

**विश्वास**—वाहवा ! माझी विनंति मान्य केलीत याबद्दल मी तुमचा आभारी आहे. ( स्मरण केल्यासारखें करून ) माझ्या मातेनें सांगितल्याप्रमाणें आतां तिचा प्रसाद भक्षण करण्याला ही अखेरची संधि चांगली आहे.

पद. ( प्रिय शिरकमला० या चालीवर. )

**मत्प्रिय जननी ॥ प्रसाद सेवुनी ॥ जातों**
**आनंदें यमसदनीं ॥ अखेरची ही आस**
**पुरवुनी ॥ घेतों आतां हे प्रियजननीं ॥**

मृत्युसमयिं मन शांत असावें ॥ त्याविण
सुगती नच सुरभुवनीं ॥ १ ॥

( आईनें दिलेले लाडू काढून फोडतो. त्यांतून रत्नें निघालेलीं पाहून आश्चर्यानें चकित होतो. )

विश्वास—अहाहा ! माते ! काय तुझें हें पुत्रप्रेमवात्सल्य ! चांडाळ मित्रांनों, हें घ्या तुह्मांला. मी एकीकडे झऱ्यावर जाऊन मातेचा प्रसाद सेवन करतों. ( जातो, व नंतर बाहेर येऊन ) चांडाळांनों, आतां फक्त प्रियमातेचें व यमधर्माचें अखेरचें स्मरण करून त्यांना वंदन करितों.

चांडाळ—ठीक आहे, लौकर आटप ह्मणजे झालें.

पद. ( नृपालकोप शांतवीन० या चालीवर. )

मातृदेवता पुन्हां कधीं तरी ॥ दृष्टिला
पडेल कां जगांतरीं ॥ प्राण-हनन । करिति
अदय नयन पाहुनी ॥ अरे खला कली
तुझ्या दयारे नाहीं हृदयिं तिळभरी ॥ १ ॥

भो यमधर्मा—

पद. ( नभांतुनी० या चालीवर. )

रवी सुता ॥ सजिवपणीं तुज करितों नमन
प्रथमतां ॥ धृ ॥ नरकाया सोडोनी ॥
येतों मी तवसदनीं ॥ दुरिताचें भस्म करुनी ॥

**देइ शांतता ॥ मद्वंशा उद्धरुनी ॥ टाकीरे**
**दिनरजनीं ॥ प्रिय जीवा जग सोडुनी ॥**
**होइ चालता ॥ १ ॥**

( वंदन करितो. )

हँ चांडाळानों, झाली माझी तयारी. पाजळा समशेर. आणखीं अशा सफाईनें शीर उडवून टाका कीं, कोणालाच श्रम होऊं नयेत. हँ आटपा लौकर. आतां विलंब कां ?

**ग्येन्या**—कारे मरग्या, अनमान कां? उडीव मुंडकेंनी काय?

**मरग्या**—गड्या, माझ्या हातून सफाईनें काम होणार नाहीं; तूंच उडीव. माझ्या हाताला कांपरें सुटलेंरे.

**ग्येन्या**—अरे, तुझ्याप्रमाणेंच माझी स्थिति झाली आहे.

**विश्वास**—चांडाळांनों, तुमच्या हातून होत नसेल, तर माझ्याजवळ द्या तलवार. हेंच कां तुमचें कौशल्य?

**चांडाळ**—( तलवार घेऊन स्वताचे शीर उडविणार इतक्यांत) ग्येन्या विश्वासा, तुझ्यासारख्या उदार मनाच्या पुरुषाला मारण्याला आह्मीं तयार झालों; यासाठीं तूंच आह्मांला मारून टाक ह्मणजे झालें. आमच्यासारखे चांडाळ जगांतून नाहींसे झाल्यानें वाईट न होतां चांगलेंच होईल.

**विश्वास**—बाबांनों, तुमच्या मागें मोठें कुटुंब असेल, मी मेल्यानें फक्त आईलाच नाहींसा होईन तुह्मीं जिवावर उदार होऊं नका. ( आपल्याशीं ) अ-

हाहा ! माते ! काय तुझ्या प्रसादाची योग्यता सांगावी ! भो साधो ! आपण " निरासकी मा " ह्मटलेंत हें अगदीं यथार्थ आहे. ( उघड ) चांडाळांनों, ही घ्या तुह्मांला रत्नें आणखी आजपासून हा दुष्ट व्यवसाय सोडून खुशाल आनंदानें वतनवाडी करून असा. ह्यांचें मोल इतकें आहे कीं, पिढीनपिढीला हें पुरें होईल. ( प्रत्येकाला दोन दोन रत्नें देतो. )

चांडाळ—महाराज, ज्यानीं आपला प्राण घेण्याकरितां आमच्या हवालीं आपणाला केलें, त्यांचा नायनाट करण्याला फक्त एकवेळ आह्माला आज्ञा द्यावी, यापुढें जर आह्मीं अशा दुष्ट कृत्याला प्रवृत्त होऊं तर या पायाची साक्ष.

विश्वास—छे, छे, असें करूं नका. त्याच्या धर्माप्रमाणें त्यांनीं केलें. अशी दुष्टबुद्धि बिलकूल मनांत आणूं नका. जा आतां, खुशाल मुलाबाळांसुद्धां आनंदानें प्रपंच करा.

चांडाळ—आपले पाय सोडून आह्मीं कोठेंही जाणार नाहीं.

विश्वास—बाबांनों ! मी आहे फटिंग, माझ्याबरोबर तुमचें जमावयाचें नाहीं. तुह्मी इतकेंच करा कीं, मला रस्त्याला लावून मग घरीं जा. मला वाट माहीत नाहीं, ह्मणून माझें एवढें काम करा.

चांडाळ—रस्त्याला लावण्याला आपणच कारण झालां. मग आपले पाय सोडून आह्मी जावें कुठें ? आतां

आपला आग्रहच आहे, सबब ऐकतों. चला आपल्याला रस्त्याला लावून मग आह्मी जातों. महाराज, आपणाला श्रम झाले आहेत, यासाठीं आम्हीं आपल्या खांद्यावरून घेऊन जातों.

विश्वास—छे! छे! मला कांहीं श्रम झाले नाहींत. मी आनंदानें चालत येतों.

( सर्व जातात. )

---

## प्रवेश २ रा.

सत्यविजय—( आश्चर्यानें ) काय जारिणीचें कृत्य पहा! तिची आशा मी तृप्त केली नाहीं, ह्मणून तिनें केवढा व्यूह रचला होता! धन्य असो या स्त्रियांची! केव्हां सर्पासारख्या उलटतील! एखाद्या यारावर मन गेलें ह्मणजे, केव्हां आपल्या पतीला ठार करतील, याचा थांग देखील लागूं देणार नाहींत. "जोरू साथ" असें ह्मणतात ते अगदीं खरें आहे. या नजरेसमोर असतील, तेथपर्यंतच आपल्या. नजरेआड झाल्यावर स्वतःच्या स्त्रीविषयीं खात्री देणें हें अगदीं पाजीपणाचें काम. ( रागानें ) थांब जारिणी! या दुष्ट कृत्याचें प्रायश्चित्त तुला भोगायला लावीन तरच मी नांवाचा सत्यविजय.

( कानोसा घेतल्यासारखें करून )

हा मंजुळ ईशभजनघोष कोणीकडून बरें ऐकूं येत आहे ? जर कोणी एखादा सत्पुरुष असेल, तर मार्गांत आपल्याला संतदर्शनाचा मोठाच लाभ होईल. असो, पूर्वींचें झालेलें सर्व दुःख एकीकडे ठेवून साधुदर्शनलाभ झाला कीं, पाप, ताप, दैन्य या तिहींचाही संतसमागमानें नाश होईल. ( असें ह्मणून निघून जातो. )

( शीतळ झाडांच्या छायेखालीं एक योगीराज नासाग्रीं दृष्टि लावून ईशभजन करीत असलेले दृष्टीला पडतात. )

**योगी**—भो सर्वांतर्याम, सर्वसाक्षी, सकल निगमागम, परमहंसरूपा—

पद. ( राग—जाल कंस, ताल—त्रिवट. )

**निराकार निर्गुणरूपा ॥ विलयानेई कलि-**
**मलतापा ॥ धृ० ॥ जगनियंता आत्मा-**
**रामा ॥ असासि सदोदित तूं विश्रामा ॥**
**विलया नेई संसृति पापा ॥ चरणिं ठाव दे**
**कारि अनुकंपा ॥ १ ॥**

हे विश्वपते, तुझ्या चतुराईचें, तुझ्या कर्तृत्वाचें, अचाट कल्पनेचें वर्णन यःकश्चित् मानवाच्या हातून कसें बरें होईल ? जगन्नाथा तूं सकल चराचर व्यापक असून अगम्य आहेस.

पद. ( बिभत्स दीपचंदी. )

मृत्तिकेची मूर्ति बनवुनि आत्मरूपाला ॥
हृदयिं ठेउनि चलन देसी अचल देहाला ॥ धृ ॥
पंचतत्वांकरवि पोषिसी अखिल जंतूला ॥
जनन-मृत्यू नित्य आहे सकल योनिला ॥
एक थारा नाहिं कोठें आत्मरूपाला ॥ वि-
विध योनीमाजि फिरविसी तूंच जगपाला ॥
ठाव देई चरणकमलीं दीन दासाला ॥
विटुनि गेलों भो परेशा जनन-मृत्यूला ॥ १ ॥

( प्राणायाम करून नासाग्रीं दृष्टि लावून बसतो, इतक्यांत सत्यविजय प्रवेश करितो.

सत्यविजय—( प्रेमयुक्त भक्तीनें उत्सुक होऊन ) अहाहा ! ही विभूती पाहिल्याबरोबर आजपर्यंत झालेल्या सर्व दुःखाचें निरसन झालें. मला बोधामृत पाजून सावध केलेले योगी महाराज तर हे नसतीलना ? असो, ज्यांचा त्रैलोक्यांत संचार, ते फिरून या हतभाग्याच्या कसचे दृष्टीस पडणार !

पद. ( मलिन वस्त्र परिधान० या चालीवर. )

पिंगल कुंतल जटा सोडुनी तुच्छ जगा मानुनी ॥ सदोदित ॥ ब्रह्मानंदीं निमग्न होउनी जाती संत मनीं ॥ सदोदित ॥ कलि-काळाची यांना नसते पर्वा त्रयभुवनीं ॥ खरोखर ॥ लय लावोनि जगन्नियंत्या घेती

वश करुनी ॥ सदोदित ॥ संतसमागम ज्याला घडला तो नर सुख भुवनीं ॥ चिदानंद चिद्रूप दर्शनें घेई शांति मनीं ॥ १ ॥
( पुढें होऊन योग्याला वंदन करितो. ) महाराज, या दीन बालकाला कृपादृष्टीनें अवलोकन करावें.

योगी--( आपल्याशीं ) ज्यानें मला सव्वा लाखाचीं रत्नें दिलीं, तोच हा सत्पुरुष यांत संदेह नाहीं. असो, ज्यानें माझ्या उपदेशाचें चीज केलें तो मला प्राणाहून प्रिय आहे. ( उघड ) आह्मा फाटिंगांच्या नादीं तूं कशाला लागतोस ?

सत्यविजय--( सद्गदित होऊन ) योगीराज, असें बोलून माझ्या आशेची निराशा करूं नका.

योगी--आह्मांपासून तुझी कोणती आशा तृप्त होणार; बरें तुझी काय इच्छा आहे ?

सत्यविजय--( हात जोडून )

पद. ( राग--पिलू, ताल--धुमाळी. )

संताऽनुग्रह मजवरि व्हावा ही इच्छा धरुनी॥ गृह-धन दारा सर्व सोडुनी फिरतों दिन-रजनीं ॥ धृ० ॥ सन्मार्गाचा शोध कराया फिरतों मी विपिनीं ॥ संतावांचुनी कोणी न दिसे एक जननि सोडोनी ॥ कोठें मजला नच आढळलें सत्य असें भुवनीं ॥ जिकडे तिकडे कलिमायेचा खेळ दिसे नयनीं ॥

योगी–तर मग संतसमागमावांचून अशी इच्छा तुझ्या मनांत कधींही येणार नाहीं. कां; मी ह्मणतों हें खरेंना ?

सत्यविजय–सत्य आहे भगवन्. कांहीं दिवसांपूर्वी एका महान् अनुभवसिद्ध योगीराजांनीं माझ्या मुखांत उपदेशामृत घातल्यापासून मी अंशतः तरी निरिच्छ होत चाललों आहे. काय त्यांची योग्यता, ती रसाळ वाणी, ती गंभीर आणि शांत मुद्रा, तें तपश्चर्येचें तेज, हीं सर्व मनांत उभीं राहिल्यानें आपल्यासारखी विभूती पाहिली कीं, त्या महात्म्यांचें स्मरण मला होऊन मी सद्गदित होतों. अशी ती नयनमनोहर मूर्ति या हतभाग्याच्या दृष्टीला फिरून कसची पडणार ? (सुस्कारा टाकतो.) असो, ते जरी नसले तरी त्यांच्या जागीं आपणच मला आहांत. यासाठीं, साधो—

पद. ( मधुरसुधा वाणी० या चालीवर. )

लीन सदा चरणीं ॥ सदोदित ॥ धृ० ॥
ज्ञानाचे तुह्मी केवळ तरणी ॥ प्रकाश देतां
ह्मणुनी धरणी ॥ सतत चालते विश्वरंगणीं॥
दास सदा चरणीं ॥ सदो०॥ लीन० ॥ १ ॥
योग-तपाची अघटित करणी ॥ नयनाल्हा-
दक मानस-हरणी ॥ ज्ञानामृत मम घालुनी
वदनीं ॥ थारा द्या चरणीं ॥ सदोदित ॥
लीन सदा० ॥ २ ॥

( चरणीं लीन होतो. )

योगी–( आनंदानें सत्यविजयाला भेटून ) अरे, जो संतरूप झाला, त्याच्यावर मी आणखी जास्त ती काय कृपा करणार ? तूर्तच्या स्थितीला तूं आणि मी एक असल्यासारखेच आहोंत, कारण——

पद. ( भू-जल-तेज समीरण० या चालीवर. )

गुरुकृपेची छाया तुजवरी ॥ असे सदोदित सत्य वैखरी ॥ धृ० ॥ साह्य असे तुज श्रीमदनारी ॥ काळ-कली भय न धरी अं-तरी ॥ चिरसुख भोगुन तूं संसारीं ॥ जाशिल अंतीं वैकुंठपुरीं ॥ १ ॥

हा माझा तुला, शिष्यत्वाचें नातें धरितोस ह्मणून पूर्ण आशिर्वाद आहे.

सत्यविजय–या पामराची व आपली बरोबरी कशी होईल ? फिरून मला संसार आहे तर ? साधो, नको नको मला तो प्रपंच ! सर्व कांहीं अनुभव घे-ऊन चुकलों आहे.

योगी–असें कसें होईल. प्रपंच व परमार्थ साधून जो या भवसिंधूतून पार पडेल त्यालाच मुक्ति वरिते. तूं मोठा राजकार्यधुरंधर पुरुष होऊन जगांत धन्य धन्य ह्मणवून घेशील. वैराग्यवृत्ति सोडून दे. आतां कांहीं तुज प्रसाद द्यावा अशी माझी इच्छा आहे; पैसा अडका आह्मा लंगोट्यांजवळ कोठून असणार ?

सत्यविजय–भगवन्, या वमनतुल्य पैशाचा मला फिरून

संपर्गसुद्धां नको. चिमुटभर विभूती जरी मला दिलीत, तरी ती इंद्रपदाहून जास्त योग्यतेची आहे.

**योगी**–( आपल्याशीं ) किती निरिच्छ याचें मन हें ! बेटा, ही विभूती तुझ्या आंगाला लावीत जा. एक वनस्पतीची यष्टी तुला देतों, ही आपल्या जवळून दुसरीकडे कोठेंही ठेवूं नकोस. ही सन्निद्ध असली कीं पिशाच्च, शाकिणी, डाकिणी वगैरेची तुला कधींही बाधा होणार नाहीं. जा आतां मार्गस्थ हो. माझी ही अन्हिक कर्माची वेळ झाली.

**सत्यविजय**–( हात जोडून ) फिरून या दासाला एकवार केव्हां तरी दर्शनाचा लाभ द्याल अशी आशा आहे. नाहींपेक्षां जसा पूर्वींच्या योगिराजांच्या वियोगदुःखांत मी जळत आहें, तसा आपल्याही दुःखानें झुरेन !

**योगी**–( आनंदानें ) देईन बरें तुला एक वेळ केव्हां तरी दर्शन. बाबारे, जसा तुला माझा वियोग होतो, तसा तुझा मला नाहींका होणार ? कांहीं चिंता नाहीं. एकवार आपण भेटूं बरें. जा परमेश्वर तुझें अक्षय कल्याण करील.

( सत्यविजय व गोसावी जातात. )



# अंक ५ वा.

## प्रवेश १ ला.

स्थळ—मणीपूर नगर.

( गोसाव्याचा वेष घेतलेला सत्यविजय प्रवेश करितो. )

सत्यविजय—( आश्चर्यानें चकित होऊन ) केवढें हें अफाट शहर ! जिकडे पहावें तिकडे व्यापारी, कारागीर, कामगार, वगैरेंची एकच गर्दी जाहलेली असून, जो तो आपापल्या उद्योगांत निमग्न झाल्यासारखा दिसतो. हें शहर थोड्या दिवसांमध्यें इतकें भरभराटीला आलेलें पाहून उद्योगाचें फळ केवढें विलक्षण आहे, याची सहज कल्पना होते. ज्यावेळीं मी पूर्वीं मित्राच्या भेटीला येथें आलो होतों, त्यावेळच्या आणखी आतांच्या स्थितीला मोठेंच अंतर पडलें. असो, विपत्कालीं मित्राची परीक्षा पहावी यासाठीं, आपण घेतलेला वेष अगदीं योग्य आहे. आतां असें उपयोगी नाहीं. माझ्यापाशीं जीं पांच अमोल्य रत्नें राहिलीं आहेत, त्यांपैकीं एक रत्न सराफाच्या दुकानांत विकण्याकरितां जावें. ( इकडे तिकडे पाहून ) हा इकडे भाजीवाला येत आहे, याला सराफगंजाचा रस्ता

विचारूं ह्मणजे झालें. ( भाजीवाल्यास ) अरे ए भाजीवाल्या.

भाजीवाला—कोन हाइ त्ये ?

सत्यविजय—बाबारे मी या शहरांत कधींही आलों नाहीं, यासाठीं सराफ कट्टयाचा रस्ता कोठें आहे, तो मला दाखविशील का ? मी गरीब बैरागी आहें.

भाजीवाला—( बेपर्वाईनें ) कोन ल्योक आपला धंदा सोडूनशान् तुला गोसावड्याला रस्ता दावनार. जा दुसऱ्या कुनाला इचार जा. ( जाऊं लागतो. )

सत्यविजय—( एकीकडे ) शहरांतले लोक किती बेपर्वाई असतात पहा ! ( उघड ) बाबारे, तूं कांहीं माझ्या बरोबर येऊं नकोस, फक्त अमक्या रस्त्यानें जा असें सांग ह्मणजे मी जाईन.

भाजीवाला—न्हाइतर कोन ल्योक खोळांबलाया ? जा त्या रस्त्यानं अक्शी नीट.

( भाजीवाला जातो व सत्यविजयही जातो. )

सत्यविजय—( इकडे तिकडे पाहून ) हँ, हाच तो सराफ कट्टा. हें जवळ दुकान दिसत आहे येथेंच जाऊन आपल्या रत्नाचा विक्रय करूं.

( सराफ व सोनार आपल्या व्यवसायांत गुंतले आहेत इतक्यांत )

सत्यविजय—शेटजी, आपल्याकडे कांहीं काम आहे, जर ऐकाल तर सांगतों.

**सराफ**–पैसा मागावयाचा असेल तर पुढच्या दुकानावर हो. कांहीं वटावा करावयाचा असेल तर ऐकतों, काय तें बोल लौकर; आह्माला आणखी उद्योग आहेत.

**सत्यविजय**–( आपल्याजवळील रत्न हातांत घेऊन ) हें रत्न आहे, ह्याची किंमत आपण काय द्याल?

**सराफ**–आण पाहूं इकडे. हातांत घेतल्याखेरीज परीक्षा होणार नाहीं. आलीकडे बाजारांत खोटीं रत्नें बरींच पिकलीं आहेत ह्मणून ह्मणतों. ( सत्यविजय हातांत रत्न देतो. )

**सराफ**–( डोळ्यांला चाळशी लावून कांहीं वेळ पाहतो. ) कायहो सुंदरशेट, इतकें कांहीं मोठें किंमतवान रत्न नाहीं, पहा बरें तुमचा तर्क कसा काय धांवतो तो?

**सुंदरशेट**–नाईक, पाणी खरें दिसतें; आतां जरा थोडासा काळा छटा दिसत आहे, पण गिऱ्हाइकाच्या कांहीं ध्यानांत येणार नाहीं. मार्मिक परिक्षकालाच हें कळणार.

**सत्यविजय**–बोला काय तें लौकर. मला आणखी काम आहे.

( सराफ व सोनार रत्नाभिलाषाबद्दल आपसांत नेत्रसंकेतानें खलबत कारितात. )

**सराफ**–गोसाव्या कोठून तूं हें रत्न आणलेंस?

सत्यविजय–कोठून आणलें, काय आणलें याची पंचाईत कशाला. किंमत काय देतां ती बोला ह्मणजे झालें. उभयतांना परवडेल तर व्यवहार होईल; नाहींपेक्षां आह्मी आपला रस्ता धरूं.

सराफ–( मुद्दाम शंकित होऊन ) कांहो सुंदरशेट, या भिकाऱ्याजवळ असलें रत्न असण्याचा आपला तर्क होतो का?

सुंदरशेट–तर्क कसचा नि काय, यानें हें रत्न कोठून तरी चोरून आणलें असावें, असा माझा पक्का तर्क होतो.

सत्यविजय–हीं आपसांतलीं खलबतें पुरेत. द्या इकडे रत्न पाहूं. समजली अक्कल! सगळा लुच्चेगिरीचा बाजार मला दिसतो. ( दरडावून ) आणा इकडे तें रत्न. ( रत्न घ्यावयास लागतो. )

सराफ–हां खबरदार रत्नाला हात लावशील तर. गोसावड्या, दीड दमडीची तुझी किंमत आणि रत्न माझें ह्मणतोस! तुला लाज नाहीं वाटत, पुढें मुकाट्यानें चालता हो, नाहीं तर सरकारी शिपायाच्या ताब्यांत देईन. ठाऊक नाहीं वाटतें इंगा.

सत्यविजम–या दरडावण्या कोणाला दाखवितां. आणा इकडे रत्न. न द्याल तर बत्तिशी हालवून देईन. आहांत कोठें?

सराफ–( रागानें आंगावर जाऊन ) फोड पाहूं बत्तिशी.

(दोघांची झटापट होते. जवळ पासच्या दुकानांतील लोक धांवत येतात) पहाहो, हा लुच्या मनुष्य माझ्या गादीवरचें रत्न उचलून घेऊन तें माझें आहे असें ह्मणतो. सुंदरशेट, आणा शिपायाला बोलावून या गुलामाला ज्ञानमंडप दाखविल्याशिवाय उपयोगी नाहीं. (सुंदरशेट शिपायाला घेऊन येतो.)

शिपाई—नाईक, कसला तंटा आहे? भर बाजारांत तंटा करणें हें सभ्यपणाचें काम नव्हे.

सुंदरशेट—शिपाईबुवा, हा गोसावडा सहज भिक्षा मागण्याकरितां दुकानावर आला. मी व शेटजी आपसांत कांहीं सोनें नाणें, जवाहीर यांची परीक्षा करण्यांत गुंतलों होतों; इतक्यांत या हरामखोरानें हळूच रत्न घेऊन पोबारा करावयाला सुरवात केली. माझें लक्ष्य चुकून गेलें ह्मणून बरें झालें, नाहींपेक्षां या राजश्रीनें दगा केला होता! हें पहा रत्न.

शिपाई—(सत्यविजयाला दरडावून) कायरे गोसावड्या, हें रत्न घेऊन तूं पळून जात होतास कीं नाहीं? खरें बोल, नाहीं तर मुसक्या बांधून चापकाचे फटकारे खावे लागतील.

सत्यविजय—शिपाईबोवा, मी पडलों एकटा, त्यांतून परस्थ गोसावी. खरें विचाराल तर रत्न माझें आहे. या सराफड्याच्या डामडौलावर आपण जात असाल तर नाइलाजाची गोष्ट आहे येथें अन्याय

झाला, तरी परमेश्वराच्या वरीं न्याय होईल.

शिपाई-( कांहीं वेळ तर्क केल्यासारखें करून ) तुझ्यासारख्या कफल्लक गोसाव्याजवळ असें अमोल्य रत्न असण्याचा मुळींच संभव नाहीं, असलें रत्न तुझ्यापाशीं असतें तर मग भीक मागत कां फिरतास? नाईक, शेटजी उठा; न्यायाधिशाकडे गेल्याशिवाय याचा छेडा बरोबर लागणार नाहीं.

सराफ-माझेंही ह्मणणें तेंच आहे. हे चोर पाहिजेल तसे निरनिराळे वेष घेऊन आह्मासारख्या गरीब व सभ्य लोकांना लुटतात. सरकारांतून यांचा न्यायनीट केलाच पाहिजे. हें रत्न तुमच्यापाशीं ध्या.

शिपाई-( सत्यविजयाच्या मुसक्या बांधून त्याला बरोबर घेऊन न्याय कचेरींत जातात. )

---

## प्रवेश २ रा.

### स्थळ—न्याय कचेरी.

( न्यायाधीश आसनावर बसले असून वकील वगैरे मंडळी व कांहीं प्रेक्षक व इतर कामगार, शिपाई, प्यादे वगैरे मंडळी अशी दृष्टीस पडतात. )

न्यायाधीश-शिरस्तेदार, आज काय खटले असतील ते सुनावणीला काढा. फार असल्यास कांहींचा निकाल आज करूं, व कांहींना मुदतीवर टाकूं.

**शिरस्तेदार**–आज प्रातःकाळीं आठ वाजतां सराफ-गंजांत वामन नाईक नांवाच्या सराफाच्या दुकानां-तून एक गोसावी अमोल्य रत्न चोरून घेऊन जात असतां, त्याला पकडलें आहे. सदर मनुष्य आपल्या शिपायांनीं मुद्देमालसह धरून आणला आहे. सराफांचा यांत मोठा तोटा झाला असता, पण वेळेवर सर्व जुळून आल्यामुळें त्याचा माल त्याला मिळून बिलंदर चोर सांपडला आहे. अशी या खटल्याची हकीकत आहे.

**न्यायाधीश**–डफेदार, फिर्यादी व आरोपी यांना हजर करा. ( डफेदार सर्व लोकांना पुकारतो. )

**वकील**–( उभा राहून ) नाइकांचें वकीलपत्र मी घेतलें आहे, यासाठीं न्यायमूर्तींना मी कळवितो. ( वकील खालीं बसतो. )

**न्यायाधीश**–शिरस्तेदार, फिर्यादीची जबानी घ्या.

**शिरस्तेदार**–( सराफाला पिंजऱ्यांत उभा करून ) मी परमेश्वर साक्ष खरें सांगेन, खोटें सांगणार नाहीं.

**सराफ**–मी परमेश्वर साक्ष खरें सांगेन, खोटें सांगणार नाहीं.

**शिरस्तेदार**–तुमचें नांव काय ?

**सराफ**–माझें नांव वामन नाईक.

**शिरस्तेदार**–रहाण्याचें ठिकाण ?

**वामन नाईक**—रत्नपूर.

**शिरस्तेदार**—आपला धंदा काय?

**वामन नाईक**—सराफगिरीचा.

**शिरस्तेदार**—काय हकीकत झाली, सांगा पाहूं?

**वामन नाईक**—आज सकाळीं सुंदरशेट आणि मी कांहीं रत्नांची परीक्षा करीत बसलों असतां एक गोसावी भिक्षा मागण्याकरितां आला, त्यानें त्या रत्नांतलें एक रत्न आमची नजर चुकवून घेतलें; परंतु इतक्यांत माझी नजर त्याच्याकडे गेली, तों त्याच्या हातांत हें रत्न पाहिलें. ह्मणून आरडाओरड केली. तेव्हां आमच्या शेटजीनीं व दुसऱ्या दुकानदारांनीं त्या गोसावड्याला पकडलें. पुढें शेटजीनीं शिपायाला बोलावून आणलें, शिपाईबोवा आले; त्यावेळीं रत्न गोसावड्याचे हातांतच होतें. खरी हकीकत ही आहे.

**न्यायाधीश**—हें रत्न आपण कधीं, आणि कोणापासून घेतलें?

**वामन नाईक**—सुमारें दहा वर्षें झालीं, आमच्या दुकानांत एक फिरस्ता व्यापारी आला होता, त्याजपासून घेतलें होतें.

**न्यायाधीश**—ठीक आहे. साक्षिदार हजर करा. (डफेदार साक्षिदाराला हजर करतो. सराफाप्रमाणेंच शेटजीची जबानी होते.)

**न्यायाधीश**—डफेदार, आरोपीला हजर करा. (शि-

पाई सत्यविजयाला पिंजऱ्यांत उभा करतो.)
शिरस्तेदार, जबानी घ्या.

शिरस्तेदार—गोसाव्या, तुझें नांव काय?

सत्यविजय—चोवीस नांवांपैकीं अगर विष्णुसहस्त्रनामांपैकीं कोणतेंही एक समजून नमूद करा; ह्मणजे झालें.

शिरस्तेदार—असें वेड्यासारखें काय करतोस? तुझें नांव तुला माहीत आहे कीं नाहीं?

सत्यविजय—एकदां सांगितलें. जास्त विचारूं नका.

न्यायाधीश—बाबारे, आईबापांनीं जें कांहीं तुझें नांव ठेवलें आहे तेंच सांग?

सत्यविजय—आपल्यालाही तोच जबाब.

न्यायाधीश—हा वेडा तर नाहींना?

वकील—अन्यायाचें माप पदरांत पडल्याचें हें वेड आहे.

न्यायाधीश—शिरस्तेदार, तो जें सांगेल तें टिपून ठेवा; उगीच जास्त वेळ नको.

शिरस्तेदार—बापाचें नांव, व रहाण्याचें ठिकाण सांग.

सत्यविजय—बापाला नांव नाहीं, तो निराकार आहे. रहाण्याचें ठिकाण ब्रह्मांड.

शिरस्तेदार—आपला धंदा काय?

सत्यविजय—धंदा ह्मणाल तर या जगांतलें खोटें, तितकें उजेडांत आणण्याचा.

शिरस्तेदार—आपण उपजीविका कशावर करतां?

सत्यविजय—आपण किंवा हे सर्व बाकीचे गृहस्थ, जें काहीं करतात तेंच मी पण करतों. ह्मणजे अन्न आणि पाणी.

शिरस्तेदार—मोठाच चमत्कारिक मनुष्य दिसतो.

न्यायाधीश—हें रत्न तुझें असें तूं ह्मणतोसना ?

सत्यविजय—होय.

न्यायाधीश—तुझ्या वेषावरून हें तुझें असावें, असा तर्क होत नाहीं.

सत्यविजय—मनुष्याची परिक्षा वेषावरूनच होतेकां ? हें रत्न माझें आहे, असें मी स्पष्टपणें ह्मणतों.

न्यायाधीश—तुला हें कोणी दिलें, किंवा सांपडलें ?

सत्यविजय—मला परमेश्वरानें दिलें, सांपडलें नाहीं.

वकील—तूं हें रत्न नाईकाच्या दुकानांतून घेऊन पळून जात होतास कीं नाहीं ?

सत्यविजय—( हंसून ) आह्मी एक विचारपूस करीत असतां, तुह्मी कां आपलें घोडें मध्यें ढकलतांहो ?

वकील—माझ्या पुराव्याकरितां हा प्रश्न आहे.

सत्यविजय—मोफत वकिली करतां किंवा कांहीं पैसे घेतलेत ?

वकील—फाजील कोण हें सर्व लोक सांगतील. ( सर्व प्रेक्षक हंसतात. )

न्यायाधीश—तूं वेड पांघरशील, तर उपयोगाचें नाहीं.

सराफाच्या ऐपतीवरून व नांवलौकिकावरून पहातां रत्न सराफाचें असावें; असें असतां, तूं आपलें ह्मणतोस, हें खोटें आहे. तर मग खरें सांग ? नाहींपेक्षां एकतर्फी निकाल करून तुला शासन भोगावें लागेल.

**सत्यविजय**—सक्तमजुरीचें कां साधें ? माझें नव्हे, असें ह्मणण्याला तुह्माला तरी आधार काय ? व सराफाचें आहे, असें ह्मणण्याला तरी आधार काय ?

**न्यायाधीश**—सरफाच्या ऐपतीवरून रत्न त्याचें आहे, अशी खात्री होते.

**सत्यविजय**—डामडौलाचा चष्मा न लावतां, न्यायाचा लावून पहा, ह्मणजे खऱ्याचा प्रकाश दिसेल. नाहींपेक्षां, अंधारच कायम राहील.

**न्यायाधीश**—तुझ्या बोलण्यावर आमचा विश्वास बसत नाहीं.

**सत्यविजय**—वेळ आली ह्मणजे तेंही समजेल.

**वकील**—मला वाटतें, या उलाढालीचें कांहींएक कारण दिसत नाहीं. न्यायमूर्तींची खात्री झालेली आहे. तेव्हां माझ्या कुळाचेंच हें रत्न आहे, असें मी जास्त तें काय सिद्ध करूं. विचारांतीं जें काय करायचें तें करून टाकावें. अशी माझी विनंति आहे, ती न्यायमूर्ति ध्यानांत आणून आरोपीस शिक्षा देतील, अशी मी आशा करितों.

सत्यविजय-( हंसून टाळ्या वाजवून ) शाबास, वकीलसाहेब शाबास, तुमच्या वकिलीच्या चातुर्याबद्दल हें त्रिभुवन तुम्हाला इनाम दिलें तरी कमीच होईल. ( प्रेक्षक हंसतात. )

न्यायाधीश-आरोपी, मी बोलतों हें लक्षांत ठेव. एकंदर गोष्टीचा विचार करतां, रत्न तुझें नसावें अशी खात्री होते. स्थूलमानावरून रत्न सराफाचें आहे, अशी खात्री होते. तेव्हां तुला तीन दिवसांची सवड देतों. कोणी जामीन मिळत असल्यास पहा. चांगलेंसें दवापाणी घेऊन नीट हुषार हो. जामीन जर न मिळेल, तर सरकारी तुरुंगांत तुला औषध देऊन तुझ्यावरील आरोपाचा निकाल करूं. कोणी जामीन मिळेल का ?

सत्यविजय-( नीट विचार केल्यासारखें करून ) माझा जामीन तरी आपल्याला लायक वाटेल काय ?

न्यायाधीश-तें कां ? लायक असेल, तर चालेल.

सत्यविजय-या नगरांत एक धनाढ्य व्यापारी आहे. त्याचा मुलगा माझा मित्र आहे. तो येथें असता तर मला जामीन झाला असता.

न्यायाधीश-त्याचें नांव काय सांग पाहूं ?

सत्यविजय-त्याचें नांव न्यायसेन. ( इतक्यांत खटला ऐकण्याकरितां आलेला न्यायसेन, उठून, )

न्यायसेन—तूं सत्यविजय काय ?

सत्यविजय—तुमचेंच नांव न्यायसेन कीं काय ?

( एकमेकाला आलिंगन देतात. )

न्यायसेन—प्रियमित्रा, तुझ्या जामिनकीबद्दल मी सरकारांत रक्कम भरतों.

सत्यविजय—मित्रा, जामिनकीबद्दल माझ्याजवळ असलेलीं आणखीं कांहीं रत्नें मी सरकारांत भरतों. ( न्यायाधिशापुढें रत्नें ठेवितो. न्यायाधीश आदिकरून मंडळी आश्चर्यभरित होतात. ( न्यायाधीश, पुन्हां सराफ व शेट यांची जबानी घेतात. )

न्यायाधीश—( रागानें ) डफेदार, या सराफड्याच्या आणि ठोकड्याच्या मुसक्या बांधा. ( शिपाई तसें करितो. ) या दगलबाजांना मी जास्त शिक्षा न देतां प्रत्येकाला पांच पांच वर्षें सक्तमजुरीची शिक्षा, आणि एक एक हजार रुपये दंड, अशी शिक्षा दिली आहे. यांनीं दररोज शहरांतील गटारें व सडका साफ कराव्यात. ( सराफ व सोनार रडूं लागतात, वकील उठून जातो. सर्व लोक फजिती करून " हरामखोरांना हीच शिक्षा योग्य " असें ह्मणून टाळ्या वाजवीत निघून जातात. )

( सर्व जातात. )

---

## प्रवेश ३ रा.

( न्यायसेन, व सत्यविजय प्रवेश करितात. )

न्यायसेन—मित्रा, केवळ जगाच्या अनुभवाकरितां तूं मुद्दाम असें साहस केलेंस, ही गोष्ट कांहीं चांगली केली नाहींस. इतका भयंकर प्रसंग जर तुझ्यावर आला होता, तर मग थेट माझ्या घरीं कां आला नाहीं ? माझ्या व तुझ्या मित्रपणांत इतकें कांहीं ऐक्य आहे कीं, तें मी सांगूं शकत नाहीं.

सत्यविजय—मित्रा, काय सांगूं तुला—

पद. ( मुरडुनि बसणें० या चालीवर. )

जलपयमिश्रण ज्यापरि पात्रीं एक रूप ब-
नतें ॥ किती गमतीचें प्रेम पहा हें थक्क मना
करितें ॥ अग्निस्पर्शें बाष्परूप जल होउ-
निया जातें ॥ स्नेहास्तव मग पयजलविरहें
अग्निमुखीं पडतें ॥ पुनरपि जल त्या-
मधें टाकितां स्वस्थानीं जातें ॥ मित्र भेटिनें
शांत होउनी पूर्व स्थिति धरितें ॥ १ ॥

मित्रा, हें पहा. विपत्काळींच खऱ्याखो-ट्याचा अनुभव घ्यावा. मी तर ह्मणतों कीं, यामध्यें मी मुळींच साहस केलें नाहीं असें जर मी न करतों तर मग मला जगाचा अनुभव मुळींच कळता

ना? काय तुला सांगू ! एका साधु महाराजांनीं मला बोधामृत पाजिलें, ह्मणूनं मी केवळ अनुभवा-करितां सव्वा लाख रुपये त्यांना दिले, ह्मणून तर प्रथमपासून मला हें सर्व समजलें.

न्यायसेन—अरे, मला तरी थोडासा स्वाद घेऊंदे.

सत्यविजय—मित्रा, एक–( **'जगिं आशेचा पिता असे हा ॥ माता साध्वी ही ममतेची'** हें पूर्वोक्त पद ह्मणतो. ) यांतून तात, भगिनी व कांता यांचा मला अनुभव आला. आतां फक्त दोन गोष्टींचा घ्यावयाचा आहे.

न्यायसेन—अहाहा ! हें कवन किती खुबीदार आहे ह्मणून सांगूं ! हें पहा, जो कोणी याचा खोल विचार करील, त्यालाच याचा उपयोग. एकंदरींत तुझ्या वडिलांना हें कांहीं शोभत नाहीं. कारण—

पद. ( शुद्ध बीज तें न गुप्त० या चालीवर. )

**अदय जनक हा तुझा असे किती जगांतरीं ॥**
**द्रव्यलोभ वाटला अधिक काय अंतरीं ॥ ध्रु० ॥**
**तनय त्यास वाटला कसा तरी विषापरी ॥**
**असे पिते नसोत हे कधीं कधीं महीवरी ॥ १ ॥**

केवळ माझ्या मित्राची अशी दशा होण्याला कारण ह्याचा पिताच.

दिंडी.

जसें उदकाविण कमल सुकुनि जातें ॥
तसें पाहुन वाटलें जिवलगातें ॥
किती निष्ठुर तव तात भगिनि कांता ॥
नसे उपमा द्यावया मला आतां ॥ १ ॥

सत्यविजया, तूं कोणाचीही पर्वा न करितां, माझ्या घरीं खुशाल आनंदानें रहा. हें पहा, "मी देह व तूं प्राण" असें तुझें व माझें नातें आहे.

सत्यविजय—इतरांची मला मुळींच पर्वा नाहीं. पण माझ्या जन्मदात्या मातेचें मी केव्हां दर्शन घेईन असें मला झालें आहे. अहाहा! काय सांगूं मित्रा, तिची योग्यता.

पद. ( लावुनी परिस०चालीवर. )

बालपणापासोनी ॥ जीव कीं प्राण समजो-
नी ॥ बोलुनी सदा मृदु वाणी ॥ ठेविते पहा
सदनीं जी ॥ आनंदखनी नयनांनीं ॥ पाहि-
न कां पुनरपि सुजनीं ॥ देवता एक ही माता ॥
लागली तिची मज चिंता ॥ भगिनीपिता
कुमती दयिता ॥ सर्वांस । नसेरे खास ।
शपथ मम आस । कलीमल त्यांनीं ॥
लावुनी घेतला सुजनीं ॥ १ ॥

न्यायसेन—तूं आतां त्यांचें नांव न काढितां मी सांगतों इकडे लक्ष दे.

पद. ( सोडी कोमलता० या चालीवर. )

दुःखानलिं हा करपोनी ॥ गेला जिवलग ॥ दिन रजनीं ॥ विपरित दैवगती सरुनी ॥ पडलासी तूं सुखसदनीं ॥ माझ्या सन्निध राहोनी ॥ कालक्रमणा घे करुनी ॥ प्राणाहुन तूं प्रियकर असती ॥ मजला या सुजनीं ॥ कांहीं न्यून नसे भुवनीं ॥ १ ॥

मित्रा, जें माझें तें तुझें. आणि तुझें तें माझें; हूं मात्र म्हण म्हणजे झालें. मग पहा.

सत्यविजय—मित्रा, हें पहा. मातेला पाहिल्याखेरीज चैन पडणार नाहीं. तुझ्याविषयीं द्वैतभाव कधीं तरी मनांत येईलका? काय थोडेंथोडकेंका अगत्य केलेंस! कोणाचीहीं पर्वा न करितां भर कचेरींत तूं मित्रत्वाचा प्रकाश सर्व जगावर पाडलास, अशा मित्राला सोडून जाण्याबद्दल मला नाहींका वाईट वाटत? उदईक माझी जाण्याची तयारी कर.

न्यायसेन—मित्रा, मग तूं जाणार तर? तुझ्याजवळ दुसरें कांहीं मागणें नाहीं. फक्त एवढें दे म्हणजे झालें.

पद. ( अहिलोकां विसरूं नको० या चालीवर. )

पूर्णेंदुपरी वृद्धिंगत लोभ करी तूं सखया ॥

नाहीं दुजी आस मला तुज कथितों हे सदया ॥
तूंच एक अससि जगीं मित्र सखा मत्हृदया ॥
या देहा प्राण खरा तूंच पहारे जगिं या ॥

सत्यविजय—

जान्हविसम शुद्ध तुझें प्रेम असेरे सखया ॥
सविनय तुज विनति करी मित्र तुझा या ॥
समया ॥ १ ॥

न्यायसेन—ठीक आहे. मोठ्या लव्याजम्यानिशीं तूं मातेच्या भेटीला जावेंस, हीच इच्छा आहे.

( दोघे जातात. )



# अंक ६ वा.

## प्रवेश १ ला.

स्थळ—मणिपूर.

( राजकन्या, दासदासी महालांत बसलेली आहेत, व पंचाक्षरी मंत्र टाकीत आहे असा प्रवेश होतो. पिशाच्च पंचाक्षऱ्याला धुडकावून आपण गुप्त होतें. इतक्यांत राजा प्रवेश करितो. )

राजा—(कमलेची विव्हल स्थिति पाहून ) मी राजा असून, माझ्यासारखा अभागी या जगांत दुसरा कोणीही नसेल. एकुलती एक कन्या, आण तिची ही दशा! ज्योतिषांनीं विवाहानंतर आपो-आप कन्येची भूतबाधा जाईल, असें सांगितल्या-वरून त्या आशेनें बरेच राजे व राजपुत्र वर योज-नेसाठीं मी कन्येच्या पसंतीकरितां पाठविले. पण या दुष्ट पिशाच्यानें त्या सर्वांचे बळी घेऊन हत्त्येचें पातक मात्र माझे माथीं ठेविलें. असो, दैवगती पुढें कोणाचें काय चालणार ? ( चिंतायुक्त मुद्रेनें ) माधविके, कालपासून आहे तशीच अद्याप कम-लेची स्थिति आहेना ?

माधविका—होय महाराज, आहे तशीच आहे. तोंडां-तून फेंस चाललाच असतो, मध्येंच गडबडून उठ-तात, फिरून निचेष्टित पडतात, गूण ह्मणून काडी-

इतकासुद्धां नाहीं. तीर्थ, अंगारे झाले; मंतरलेले ताईत झाले; बळिदानं झालीं; सर्व कांहीं झालं; पण हें मेलं जबरदस्त भूत कांहीं हालत नाहीं.

राजा—( कपाळाला हात लावून ) काय माझें नशीब तरी!

पद. ( ईशप्राप्तीस्तव हे बनले॰ या चालीवर. )

**अगणित पंचाक्षरी जाहले तरि न गूण अजुनी ॥**
**तव चिंतेनें हृदय पेटतें चैन नसे स्वप्नीं ॥धृ॰ ॥**
**मत्प्रिय दुहिते काय करूं मी झुरतों दिन-रजनीं॥**
**दशा तुझी ही पाहुनि येती उष्णाश्रू नयनीं ॥१॥**

काय करूं! या जबरदस्त पिशाच्चाच्या तडाक्यांतून माझ्या लाडकीची सुटका होईल, असें मला वाटत नाहीं! हिची ही दशा पाहून हृदयांत कसें भडभडून येतें!

पद. ( विद्या लक्ष्मी स्वधर्म नीति॰ या चालीवर. )

**वदनावरती पांडुरता ये गाल सुकुनि गेले ॥**
**कृश तनु होउनि देहामध्यें त्राण नसे उरलें**
**॥ धृ॰ ॥ दशा तुझी ही नयनिं न बघवे काय**
**करूं बाले ॥ मधुर शब्द मजसवें बोलगे झडकरि**
**तूं विमले ॥ १ ॥**

( एकाएकीं कमला किंकाळी फोडते. राजा व दासी तिला वारा घालून सावध करूं पहातात. इतक्यांत दारावर कोणी हाक मारतात )

राजा–माधविके, कोण आहे तें पाहून ये जा पाहूं.

( माधविका जाऊन येते. )

माधविका–द्वारपाल वर्दी देण्याकरितां आला आहे, आज्ञा होईल तर घेऊन येतें. ( दासी द्वारपालाला घेऊन येते. )

द्वारपाल–( लवून मुजरा करून ) महाराज, आपल्याला आनंदाचें वर्तमान सांगण्याकरितां आलों आहें.

राजा–( उत्सुकतेनें ) द्वारपाला, सांग काय तें अगोदर.

द्वारपाल–नगराबाहेरील शिवमंदिराजवळ कोणी एक युवराज देशपर्यटनासाठीं मोठ्या लव्याजम्यानिशीं येऊन उतरला आहे. आजपर्यंत शेंकडों राजेरजवाडे येऊन गेले, पण ह्याच्यासारखा तेजस्वी पुरुष अद्यापपर्यंत मी तरी पाहिला नाहीं. मग काय यक्ष आहे. किंवा गंधर्व आहे नकळे.

राजा–( आनंदानें ) द्वारपाला, प्रधानजीला हे सर्व वृत्त कळवून त्यांना असें सांग कीं, आपण स्वतः जाऊन त्या तरुण राजपुत्राला वाड्यामध्यें भेटीला आणावें. मी त्याच्या भेटीसाठीं उत्सुक झालों आहें. असाच कोणी एखादा हरिचा लाल माझ्या कन्येला पिशाच्चाच्या त्रासांतून खास सोडवील, असें मला वाटतें. ( कमलेला कुरवाळून ) बाळे, तूं कांहीं काळजी करूं नकोस. प्रयत्न करणें हें काम

आमचें, यश येणें ईशाधीन. ( द्वारपाल जातो. ) माधविके, इच्या सेवेंत असत जा अँ ! तिनें न खाल्लें तरी थोडें थोडें खायला देतजा. एखादे-वेळीं धाडकन् आंग टाकून निचेष्टित पडेल, त्यावेळीं सावध करीत जा. मी जातों, आणि त्या तरुण राजपुत्राची भेट घेऊन त्याला महालांत पाठवून देतों. नेहमींप्रमाणें फलआहाराची तयारी असूंदे. ( शुभ चिन्ह झालेंसें दाखवून ) आज मला शुभ चिन्हें कां बरें होतात ! यावरून खचित वाटतें कीं, माझा मनोदय ईशदयेनें खचित तडीला जाणार, यांत बिलकूल संशय नाहीं. ( राजा जातो. )

कमला—( सावध होऊन ) कायग माधविके, बाबा गेले कांग ?

माधविका—होय. बाईसाहेब, आतांच गेले. हें पहा बाईसाहेब, आज कोणी एक युवराज आपले वाड्यांत येणार आहेत, ते मोठे तेजस्वी आहेत असें द्वारपाल त्यांना सांगत होता. ईश्वर करो नि हाच राजपुत्र आपला पति होवो ह्मणजे सर्वांना खचित आनंद होईल.

कमला—( दुःखाचा सुस्कारा टाकून ) इतकें कुठें आहे माझें नशीब बलवत्तर ! त्या मेल्या कृतांताच्या दाढें-तून माझी सुटका होण्याची बिलकूल आशाच नको. काय सांगूं तुला !

पद. ( व्यर्थ मी जन्मलें० या चालीवर. )

विपरित दैवगती सखये॥गांजुनि गेलें पिशाच्च
भयें ॥ या दुःखांतुन सोडविण्याला ॥ कोणि
नाहिंना मत्प्राणाला ॥ या समयीं सखये ॥
॥ धृ० ॥ कृश तनु होउनि वदनावरती ॥ ते-
ज न उरलें ह्मणुनि मन्मती॥भ्रमतेगे सखये ॥१॥

माधविका–अति दुःखाचा परिणाम सुख आहे, हें आपणाला मी खात्रीनं सांगत्यें.

कमला–तूं माझ्या मनाचं सामाधान होण्याकरितां कांहीं तरी बोलतेस झालें. हें पहा !

पद. ( अवचित कैसा० या चालीवर. )

कांतावांचोनी जन्म असे अबलांचा ॥ जगतीं
या निष्फळ साचा ॥धृ०॥ आला त्रास पहा
खचित मला जन्माचा ॥ पंथ दिसे मज मृत्यू-
चा ॥ मजसाठीं नर बळी पडले ॥ अभिला-
षें हें जग मुकलें ॥ हत्यांचें पातक घडलें ॥
फेडूं कोठें मी संग्रह हा दुरितांचा ॥ शेवटीं
वास अधोगतिचा ॥ १ ॥

माधविका–बाईसाहेब, निराश होऊन असं अभद्र काय ह्मणून बोलतां ?

कमला–अग, मला वेड कां लागलं, खरं तेंच बोलतें.

( इतक्यांत वसंतिका लगबगीनें येते. )

माधविका—काग, अशी लगबगीनें कां आलीस ?

वसंतिका—अग, महाराजांनीं सांगितलें आहे कीं, मंदिरांतली सर्व तयारी करून ठेवा.

माधविका—आले काग ते राजपुत्र ?

वसंतिका—अग हो. ( आश्चर्यानें ) कसा पण मदनाचा अगदीं पुतळाच आहे. ती शरिराची ठेवण, बोलण्याची ऐट, एक ना दोन किती ह्मणून सांगूं गोष्टी. बरं, सर्व तयारी असूंदे अँ.

माधविका—त्याची नको तुला काळजी. कां बाईसाहेब, मी सांगितलेलें खरें कां खोटें ? ( चाऊल झालेली ऐकून ) अगबाई स्वारी आली वाटतं.

( सत्यविजय प्रवेश करितो. )

कमला—( चोरून त्याला पाहून ) देवा, हा पती जर मला मिळेल, तर आजपर्यंत झालेल्या दुःखाचं सार्थक होईल. आणि जर कां नेहमींसारखा विपरीत प्रकार घडला, तर या पुरुषाबरोबर मी सहगमन करून आपली मुक्तता करून घेणार. देव असें न करो हीच इच्छा. ( दासी जाते. )

सत्यविजय—( आपल्याशीं आश्चर्यानें ) कधीं कोठेंही न पाहिलेली रीत आज माझ्या अनुभवाला आली. बरें हें सर्व कपट ह्मणावें तर राजेसाहेबांच्या बोलण्यावरून मला त्याचा लेशही दिसला नाहीं. मग या उपर काय गौडबंगाल असेल तें नकळे,

काहीं असो, हें मंदीर जरी इतकें भव्य आहे, तरी या ठिकाणी उदासीनता दिसते. (कमलेकडे पाहिल्यासारखें करून ) या चारुगात्रीला काहीं तरी दुःख होत असावें असें दिसतें. पण आज माझी अशी वृत्ति कां बरें होते ? या कामकलिकेवर मन्मन भ्रमर रुंजी घालण्याविषयीं इतका अतुर कां बरें होतो ? ( विचार केल्यासारखें करून ) हँ, आतां आलें ध्यानांत ! संतवाणी नजरेसमोर उभी राहिली "जागे सो पावे और सोवे सो गमावे" मना असें चंचळ होऊं नकोस, स्थीर हो स्थीर हो. ( स्तब्ध उभा रहातो. )

कमला–( आपल्याशीं ) या पुरुषाला पाहिल्यापासून माझं मन चलबिचल व्हायला लागलं. असं वाटतं कीं, जावं नि एकदम कडकडून भेटावं. ( घाबरून ) अगबाई, असं केलं तर ते मला निर्लज्ज नाहींका ह्मणणार ? आजन्मांत अशी माझी स्थिती झाली नव्हती. डोळे भरून हाच काय तो दिव्य पुरुष मी पाहिला. यामुळं तर असं होत नसेलना ? जाऊंका ह्यांच्यापाशीं. जातेंच मग काय होईल तें होवो.

( सत्यविजयाच्या जवळ जाते. )

सत्यविजय–( आपल्याशीं ) परिचय नसतां, एकाएकीं ही स्त्री लगट कां बरें करते ? कपटरूप घेतलेली ही कोणी शाकिणी अगर डाकिणी तर नसेलना ?

कमला–( अगदीं जवळ जाऊन ) आपण उभे कां ?

बसायचं नाहीं कां ? एकांतांत स्त्रीपुरुषांनीं अबोला धरल्यावर मग एकांत तो कसचा ? यावेळीं जिवाचे लाल आपणच आहांत. खरोखर आपल्यावांचून इतर पुरुष मला बंधुपित्यासारखे आहेत. कां शंकितसे होतां ? मी कपटानं बोलत असेन तर जिव्हां गळून पडेल.

सत्यविजय–परस्त्रीला परिचयावाचून कसा बरें स्पर्श करावा ?

कमला–इतकं मी सांगितलं तरी अद्याप "परस्त्री" मानतां हें चांगलं नव्हे बरं. मी नाहीं गडे सोडायची जा. ( लडिवाळपणानं त्याला स्पर्श करिते. )

सत्यविजय–( हंसून ) पुरुषांपेक्षां स्त्रियाच जास्त आतूर असतात तर ?

कमला–हीं सर्व प्रीतिचीं लक्षणं आहेत या असें मंचकावर. हा सर्व पोषाख उतरा, मला आपल्या आंगाला उटी लावावयाची आहे.

सत्यविजय–( आपल्याशीं ) मला उघडा करून चाबकाचे फटकारे नाहींना मारविणार ? काय नेम सांगावा, हें गौडबंगाल मोठें विलक्षण दिसतें. ( उघड ) नृपतनये, तूं विनय दाखवून हें कपट तर नाहींसना करीत ?

कमला–( गळ्याला मिठी मारून ) प्रिया, अजून आपल्याला संशयचना ? आपण माझ्या निर्लज्जपणाची

मला क्षमा करा. खरोखर मी मोठी भाग्याची, ह्मणून आपल्या तेजानं हें मंदिर प्रकाशीत झालं; नाहीं तर इथं मेला अंधःकार.

**सत्यविजय**—तो कसला ?

**कमला**—प्रिया, रागवणार नाहींना ?

**सत्यविजय**—नाहीं.

**कमला**—भिणार नाहींना ?

**सत्यविजय**—नाहीं.

**कमला**—माझा अव्हेर करणार नाहींना ?

**सत्यविजय**—नाहीं.

**कमला**—वाहा तर माझ्या गळ्याची शपथ.

**सत्यविजय**—तुझ्या गळ्याची शपथ. ( शपथ देतो. )

**कमला**—( एकाएकीं फेंफरें आल्यासारखें करून किंकाळी फोडून त्याच्या आंगावर पडते. )

**सत्यविजय**—( घाबरून सावध करूं लागतो, सावध होत नाहीं असें पाहून ) प्रिये, याकरतां कां शपथ घेतलीस ? बोल ! सावध हो ! अशी कांपतेस कां ? डोळे कांग मिटतेस ? अरे, हिची दांतखिळी बसून तोंडांतून फेंस देखील येऊं लागला ! देवा ! काय मजवर हें संकट ! जर कांहीं भलतें सलतें झालें, तर या राजवाड्यांतील लोक मीच हिला ठार मारिली, असे ह्मणून माझे तुकडे तुकडे कर-

तील. अविचारानें माझ्या हातूनच मी आपल्या नाशाला कारण होणार ! असो, कांहीं इलाज करून पहावा ! सावध झाले तर बरें ! नाहींपेक्षां मृत्यूला तयार झालें पाहिजे. ( वारा घालतो. )

( इतक्यांत एक पिशाच्च लपत लपत व वेडी वांकडी पाउलें टाकीत प्रवेश करितें. सत्यविजय त्याला मंत्रानें भारतो. )

सत्यविजय—हँ समजलों. हा सर्व पिशाच्चप्रभाव आहे. आपोआप वाघाच्या जबड्यांत येऊन पडल्यासारखें झालें. आतां हें पिशाच्च काय काय चमत्कार करते तें पहावें. ( कमलेला पलंगावर निजवून आपण एकीकडे जातो. )

पिशाच्च—( आरोळी ठोकून व मोठ्यानें हंसून ) गम्मतच आहे गम्मत. आज नरबळीची आहुती या पठ्ठ्याला मिळणारशी दिसते. ( वास घेतल्यासारखें करून ) मनुष्याचा वास आहे बरें ! जरा नाचून पोटबीट अगदीं साफ केलें पाहिजे. आज नेहमींपेक्षां माझें पोट अगदीं तुडुंब भरलें आहे. ( मोठी ढेंकर देउन नाचत नाचत. )

पद.

नरमांस खंड शोणितासहीत सेवुनी ॥
यथेच्छ झोंप घेवुनी सुखी असे जनीं ॥
रतीविलास आस ही वसे सदा मनीं ॥
ह्मणोनि पूर्ण हेतुला करीं सुलोचनी ॥

किती सुरेख रूप हें धरून कामिनी ॥
धनी तुझा उभा असेग हात जोडुनी ॥ १ ॥

पद. ( व्यांडचे चालीवर. )

नृपतनयेवर हें मन माझें बहुतां दिवसांपासोनी ॥ गुंतून गेलें ह्मणून ऐसा पिशाच्च गेलों मी बनुनी ॥ मी हिचा पती । या जगीं असे ह्मणुनि इजवरी । प्रेम जडतसें ॥ अजवरी पहा घेतले बळी ॥ सोडुनी दया बहुत नरबळी ॥ मन रमणी ॥ नव तरुणी ॥ १ ॥

( फिरून चेष्टा करून सत्यविजयाला हुडकतो त्याला पाहून ) आजपर्यंत शेंकडों नरबळी खाऊन मी फस्त केले, पण असा लोण्याचा गोळा कधींच मिळाला नव्हता. ( सत्यविजयाला खाण्याकरितां धांवतो. )

सत्यविजय—(रागानें) हँ, खबरदार पुढें येशील तर, तुकडे तुकडे करून टाकीन. ( मंत्र टाकल्यासारखें करतो. )

पिशाच्च—( धाडकन् खालीं पडतें, फिरून उठून ) मग तुला खाईन. थांब, आतां तेथून जिवंत कसा सुटतोस तें मी पहातों.

सत्यविजय—तोंडची वाफ कशाला दवडतोस ? पुढें ये तर खरा, मीहीपण दोन हात दाखवितों.

पिशाच्च—माझें काम झाल्यावर मग दाखवितों सपाटा.

पद. ( अंजनपर्वा न करी पर्वा० या चालीवर. )

प्रेम—शृंखला घालुनि बंधन केलें मदनें जिकोनी ॥ प्रेताचें मज भूत करोनी हिंडवीतसें या भुवनीं ॥ प्रबलाशेचा ऱ्हास होइना नृपतनयेच्या प्रीतिंतुनी ॥ सुटका कैशी होती नकळे कांहिं सुचेना मज अजुनी ॥ १ ॥

प्रिये, माझ्याकडे पहा तर खरी. पहा, मी तुझ्याकरितां किती नटून आलों आहे तो ?

पद. ( अंगिकार करूनि हिचा० या चालीवर. )

अनंग लाजतो मला बघून अंतरीं ॥ नसे मृदू शरीर यापरी जगावरी ॥ धृ० ॥
किती सुरम्य वर्ण हा खुले सुमंदिरीं ॥ खरा हिरा पहा कुठें लपेल कां तरी ॥ १ ॥

हें पहा, अशी लाजूं नकोस, भिऊं नकोस, ये माझी लाडकी ती.

पद. ( लावणीच्या चालीवर. )

मी पोपट तूं मैना ॥ मला पाहुनी ऐन समयिं तूं कां मिटिसी नयना ॥ ऐकगे सखये मम वचना ॥ आलिंगन दे झडकरी आतां प्रियकर सुखसदना ॥ करुं दे अधरामृतपाना ॥ आज्ञा देई चुंबन घ्याया झडकरि या वदना ॥ १ ॥

पद. ( लावणीच्या चालीवर. )

मनरमणी ॥ किती करूं तव मनधरणी ॥
मदनमंजिरी मत्प्रिय–सुंदरी न धरी किमपी
भीति मनीं ॥ शपथ तुला गे मत्प्राणाची बोल
मजसवें मृदु वचनीं ॥ तवाभिलाषें पिशाच्च
झालों प्रेमपाशिं या पडुनी ॥ असुनि ऐसें कांगे
रुससी लागलों तुझ्या भजनीं ॥ १ ॥

( असें म्हणून कमलेला आलिंगन देण्याला पाहतो. )

सत्यविजय–( मंचकाजवळ येऊन ) पिशाच्चा, बोल लौकर. तूं मुकाट्यानें हिची आशा सोडून मुक्ति घेतोस का मारून टाकूं.

पिशाच्च–मारून टाकण्याला तुला जिवंत ठेवीन तरना? ( खायाला धांवतें पण भीतीनें जमिनीवर पडतें. ) अरे आज हा जबरदस्त सवाई कोण बरें असेल ? मानवा, आतां तुला गिळून टाकतों. ( पुन्हां आंगावर धावतें. पुन्हां पडतें, विव्हल होऊन रडूं लागतें. )

सत्यविजय–( तलवार पाजळून. )

पद.

प्रबल भूता प्रेत करितों तीक्ष्ण शस्त्रानें ॥ भोग
आतां दुर्मतीचें सुफल सौख्यानें ॥ निहंत्या-
ला बळी देतों थोर सन्मानें ॥ ग्रासिलें तुज
सत्य कथितों दुष्ट कालानें ॥ १ ॥

पिशाच्च—पुण्यपुरुषा, मला छळूं नकोस. मी तुला आनंदानें माफी देतों.

सत्यविजय—मला तूं माफ करणार काय? पहा, विचार कर. येथून तूं जिवंत सुटशील असें मनांत देखील आणूं नको. पहा, विचार कर. तुला मंत्रानें मी इतका मारून टाकला आहे कीं, फिरून तुला जाग्यावरून देखील हालूं देणार नाहीं.

पद. ( सोडोनी या भूपतिला० या चालीवर. )

सोडुनी दे या स्त्रियेची आस भुता सत्वरी ॥
ठार करुनी कळस करितों दुर्गतीचा ना-
तरी ॥ प्रबल अरि तुज भेटला नच ह्मणुनि
चेष्टा अजवरी ॥ चालवोनी गांजिलेंसी
नृपसुतेसी मंदिरीं ॥ प्रखर खड्गा या पि-
शाच्चा निमिषमात्रें संहरी ॥ १ ॥

पिशाच्च—( दुःखाची किंकाळी फोडून ) पुण्यपुरुषा, नको नको, छळूं नकोस. मी तुला शरण आहें. मंत्राग्निज्वालेनें माझें शरीर जळत आहेरे!

पद. ( नृपशिक्षेची मज नच पर्वा० या चालीवर. )

सर्वांगाचा भडका होतो आणि ह्मणावा
तरी नच दिसतो ॥ भ्रांतचित्त मी होउनि
जातों ॥ प्रबल रिपू मजसी छळितो ॥ या
शरीरांतील सत्व हरोनी मंत्रबळें कैसें नेतो ॥ १ ॥

सत्यविजय--( आठवल्यासारखें करून ) वाहवा ! हा सर्व सद्गुरुच्या प्रसादाचा प्रभाव. नाहींपेक्षां या पिशाच्चानें माझी केव्हांच आहुती करून टाकिली असती ! ( हातांत वनस्पतीची यष्टी घेऊन ) पिशाच्चा, तूं भल्या गोष्टीनें मुक्ति घेतोस, का दडपूं जमिनींत ?

पिशाच्च--( हात जोडून ) मी शरण आहें; जें सांगाल तें ऐकतों; मी निराश होत चाललों; मात्र छळूं नका ! तुमची आज्ञा शिरसावंद्य आहे.

सत्यविजय--( काठी जसजशी फिरवितो तसतसें पिशाच्च फिरतें. )

पद. ( नर मांस खंड० या चालीवर. )

ऊठ बैस ऊठ बैस येथ येउनी ॥ फिरून ऊठरे
तसाच हात जोडुनी ॥ नाक घांस जाहला-
स आजपासुनी ॥ दास तूं हिचा ह्मणोनि
मी तुझा धनी ॥ धनी हुकूम जो करिल तो
न ऐकुनी ॥ करील दांडगाइ त्या नसे गती
जनीं ॥ मार हा पगार त्यास सतत देउनी ॥
चाकरी करून घेति लाथ मारुनी ॥ १ ॥

( पिशाच्च नाचूं लागतें. )

पिशाच्च--महाराज मी दासानुदास आहें, मी मुक्ति घेतों, असे हाल सोसण्यापेक्षां मुक्ति घेणें चांगलें.

सत्यवियज—मला शरण न येतां जिला तूं आपली स्त्री झणत होतास तिला शरण जा. धांस हिच्या पुढें नाक.

पद. ( करि अति त्वरा० या चालीवर. )

चरणिं शरण जा ॥ झडकरि करि नमन इ-
जसी ॥ सोडि वासनेस दास होई भूपजेचा ॥
आजवरी अबलेसी ॥ रात्रं दिन छळिलेंसी
राम, राम, राम, झणुनि मुक्ति घेई जा ॥ १ ॥

पिशाच्च—माते मी तुला शरण आहें. आतां तुझांपाशीं इतकेंच मागतों कीं,—

पद. ( राग-भैरवी, ताल-दादरा. )

दैवदुर्विलास भोग आज पूर्ण संपला ॥
नरकवास करुनि विफल देह मात्र शीणला ॥
राम, राम, राम, राम, राम ॥ काल दर्श-
नास झणीं पाठवून द्या मला ॥ पतिव्रते तु-
झ्या पतीस दास हाच शोभला ॥ दीन दास
चरणिं लीन सर्व काल जाहला ॥ झडकरि
तुह्मी करुनि त्वरा मुक्ति लाभ द्या मला ॥
राम, राम, राम, राम, राम ॥ १ ॥

महाराज आणखी काय आज्ञा आहे, माझ्या सर्वांगाला जखडून टाकून कड्यावरून लोटून द्या ह्मणजे मला मुक्ति मिळेल, आपण माझे पिते अहांत मी सर्वापराधी आहे. आतां क्षमा करा, एवढी तसदी घ्या.

सत्यविजय–( पिशाच्चाला मारून जखडून बांधितो. व कमलेला सावध करितो. )

कमला–( घाबरून ) प्रिया, मला सोडवा हो सोडवा. ( फिरून बेसावध होते. )

सत्यविजय–( कमलेच्या आंगावरून वनस्पतीची पट्टी फिरवितो व पोटाशीं धरून. )

पद. ( शिरीं गंगा० या चालीवर. )

नसे भीती मुळीं आतां प्रिये तुजला समंदा-
ची ॥ स्वयें मुक्ती दिली साला जगांतूनी
अखेरीची ॥ रतीसुखदान दे आतां करी तृप्ती
अनंगाची ॥ कमलनयने तुला साजे खरी
उपमा कुलस्त्रीची ॥

कमला–( सत्यविजयाच्या मानेवर मान ठेवून ) प्रियकरा दीनदासीला अंतर दिलें, तर खरोखरी मी आपला प्राण ठेवणार नाहीं.

सत्यविजय–लाडके, आतां शोक काय ह्मणून करितेस? हें पाहिलेंसका तुझें छळ करणारें धूड.

कमला–( त्रासून ) नकोग बाई त्या मेल्याला पाहिल्यानें माझे नेत्र अपवित्र होतील. प्रिया, मला तहान लागली आहे. थोडसं पाणी द्या.

सत्यविजय–(विनोदानें ) अधरामृतपान कर ह्मणजे झालें.

कमला–( लाजून मान खालीं घालते इतक्यांत दारावर थापमारून बाईसाहेब बाईसाहेब असें ह्मणून कोणी ओरडतात. )

सत्यविजय—कोणग हे दुष्ट आपल्या सुखाचा विरस करण्याकरितां आले. मी नाहीं जाऊं देणार जा. हेंग काय असें ?

कमला—प्रिया मी आतां तुमचीचना ? मग असे आतुर कां बरें होता ? मी आतां रात्रंदिवस आपलीच आहे. ( पुन्हां हाक मारतात. )

सत्यविजय—ज्यांनीं माझ्या रंगाचा बेरंग केला त्यांना आतां ठार करितों.

कमला—( लीनतेनें ) प्रिया असें करूं नये. खरें सांगू ( सत्यविजयाच्या कानांत कांहीं गोष्ट सांगते. )

सत्यविजय—खरें ह्मणतेस कीं काय ! तर जा कडी काढ.

कमला—( कडी काढून त्यांना आंत घेते. )

मुडदेफरास—अर मर्दा फसलोर फसलो. ह्य महाराज जिवंत हाइतीन् बरं झालं लई कटाला आला व्हता. अक्शी कमीत कमी शेपन्नास मुडदं ह्मत पडल असत्याल. चला ह्य संमूद महाराजासनी सांगू या. आतां मर्दा तुंपपोळीची चंगळच चंगळ.

कमला—अरे महाराजांना मी इकडे बोलावतें ह्मणून सांगजा.

( गुडदेफरास जातो. महाराज प्रवेश करितात. )

राजा—( सत्यविजयाला पाहून ) अहाहा ! पुण्यपुरुषा, मला अगोदर आलिंगन दे पाहू ( तसें करितात ) अरे पण हें येथें कसलें घूड पडलें आहे ?

सत्यविजय–आपल्या दुःखाचा हा कंद. याला मारून टाकिला आहे. मोठा जबरदस्त समंद होता पण त्याची खात्री करून टाकली.

राजा–अरे दुष्टा, भली चांदी आटली तुझी.

सत्यविजय–पिशाच्चा महाराजांना शरण जाऊन त्यांची माफी माग.

पिशाच्च–महाराज आजपर्यंत आपल्या कन्येला मी पूर्व दुष्कृतामुळें छळिलें, आतां ही आपली कन्या माझी माता आहे, झालेल्या गोष्टीबद्दल क्षमा करून या चांडाळाला कड्यावरून लोटून द्या, ह्मणजे मी कृतकृत्य होईन !

राजा–अरे जा घेऊन याला आणि मोठ्याशा कड्यावरून द्या लोटून. जा आटपा लौकर. ( चाकर पिशाच्चाला घेऊन जातात. ) आज ईशकृपेनें केवढा आनंदाचा सुदीन उगवला ! हे श्रेष्ट पुरुषा.

( सत्यविजयाचा हात कमलेच्या हातांत घालून. )

साकी.

प्रियकन्या तुज प्रेमें अर्पण करितों आनंदानें ॥
सर्व राज्य हें असे तुझेंरे स्वीकार करि प्रेमानें ॥
प्रियकर जामाता ॥ सुखें राज्य करीं आतां ॥ १ ॥

झालें आतां राज्यसूत्र तुझ्या हवाली करून तपानुष्ठानाला मी जातों.

सत्यविजय–महाराज माझ्या प्रियमातापित्याचें दर्शन

घेऊन मग आपल्या आज्ञेप्रमाणें करीन नववधूसह घरभरणी करून मला कुलदेवतेची शांति केली पाहिजे.

राजा—ठीक; तुमच्या मताप्रमाणें होऊंद्या. लागेल तितका लवाजमा घेऊन मोठ्या थाटानें जा. माझ्या कन्येचा कधींही अव्हेर न करितां सुखानें राज्य केलेंत ह्मणजे मी कृतकृत्य होईन. उभयतांनीं मंगलस्नान करून भोजनानंतर, मग आगमनाची तयारी करा. मी पुढें जातों. ( राजा जातो. )

कमला—प्रिया, ( आलिंगन देते. )

पद. ( धनलोभापुडती० या चालीवर. )

अर्पितसे देह तुह्मां या समयीं ही युवती ॥
हीच खरी प्रीतीची रीत असे या जगतीं ॥
तदोपकृति फेडूं बरें काय करोनी सुमति ॥
प्रियदासी घ्या पदरीं करित असे ही विनती ॥

सत्यविजय—

पद. ( भैरवी-झंपा. )

चंद्रमा रोहिणी संगमा पाहुनी ॥ ज्यापरी
होतसे तोष नयनीं ॥ तूंच हृदयंगमा अंगना
या जनीं ॥ सत्य गमतेस गे सकल भुवनीं ॥
अनुदिनीं साक्ष तुज ठेवुनी ईश्वरा सुंदरिस
ठेवितों हृदयभुवनीं ॥ १ ॥

( दोघे जातात. )

## अंक ६ वा समाप्त.

# अंक ७ वा.

## प्रवेश १ ला.

स्थळ—सत्यविजयाच्या सासऱ्याचें घर.

चंद्रकेतू–( आनंदानें ) विश्वसेना, मनोरमा मोठी भाग्याची. आजपर्यंत शशिविरहित निशेप्रमाणें तिला पहात होतों. पण आज पूर्ण शशियुक्त तिला पहाणार यामुळें, मला किती आनंद झाला आहे ह्मणून सांगूं ?

विश्वसेन–आपल्या नगराबाहेर उतरलेले हे आपलेच जामात का ?

चंद्रकेतू–होय तेच. पुरुषाचें भाग्य केव्हां उदयाला येईल, याचा नेम नसतो. वडिलांनीं वस्त्ररहित घरांतून घालवून दिलें होतें, परंतु परमेश्वरानें त्यांचेवर कृपा केली कीं नाहीं ?

विश्वसेन–आणखी पूर्वीं मी आपल्याला सांगितलें होतें कीं, ते जर सूज्ञ असतील, तर प्राणनाश वगैरे करून न घेतां जन्माचें चीज करतील. त्याप्रमाणें योगायोग घडून आला कीं नाहीं ?

( इतक्यांत सत्यविजयाकडून चोपदार येतो. )

चोपदार–( चंद्रकेतूला मुजरा करून ) महाराज, सत्यविजय महाराजांनीं आपणाला असें कळवायला

सांगितलें आहे कीं, लौकरच भेटीला येतों. मला फार वेळ रहातां येत नाहीं. कांहीं जरूरीच्या कामा-करितां त्यांना कांतीपुरला फारच जलदीनें जावयाचें आहे, उगीच थाटमाटाच्या भरीस पडूं नये, ह्मणून आगाऊ सूचना दिली आहे. मी निरोप घेतों. ( जातो. )

**विश्वसेन**—कांहो चंद्रकेतू, आपल्या जामाताचा थाटमाट तर मोठा दिसतो. अहो, नुसत्या चोपदाराचा इतका थाट, तर मग मुख्य यजमानाचा कांहीं विचारूंच नका.

**चंद्रकेतु**—चार दोन मुक्काम स्वारीचे झाले असते, ह्मणजे बरें झालें असतें. जाण्याची त्वरा दिसते, यामुळें आग्रह करणें हें मला कांहीं प्रशस्त दिसत नाहीं. असो, साधाच बेत कां होईना, पण ऐपतीला शो-भेल असाच केला पाहिजे. विश्वसेन, तुह्मी फळफ-ळावळ, पान, गुलाब, हार वगैरेची तजवीज ठेवा. ( विश्वसेन जातो. ) मनोरमे, अग मनोरमे, अग-इकडे ये. हें बघ आतां तुझा पती येथें येणार आहे; यासाठीं पंचारती वगैरेची तजवीज ठेव. फार दि-वसांनीं त्यांची पायधूळ येथें पडणार, तेव्हां मी सांगितलेलें चुकूं नकोस. ( मनोरमा जाते व विश्व-सेन येतो. )

**विश्वसेन**—आज्ञेप्रमाणें सर्व कांहीं बेतबात ठाकठीक

ठेवला आहे. फक्त त्यांचा येण्याचा अवकाश. आहे, जिन्नस घरांत असल्यावर थाटमाटाची काळजी ती कसली ? नाहींपेक्षां आयतेवेळीं बाजारांत जाऊन थाटमाट होतो का ?

( इतक्यांत सत्यविजय आले ह्मणून भालदार पुकारतात. )

विश्वसेन–( ऐकलेसें करून ) चंद्रकेतू, अहो जामाताची स्वारी आलीशीं दिसते. ऐका; भालदारांच्या पुकारण्या. ( आश्चर्यानें ) मोटाच थाट दिसतो तर. मला वाटतें, जामातांनीं कुठलें तरी राज्यपद पटकावलें. याला ह्मणावें भाग्योदय. पैशाकडे पैसा धांवतो ह्मणतात तो असा. ( इतक्यांत सत्यविजय भालदारांसुद्धां प्रवेश करतो. भालदार पुकारतात. )

( सत्यविजयाला चंद्रकेतू उत्थापन देतो. बरोबर नूतन राणीही असतेच तिला पाहून सर्व आश्चर्य करितात. )

चंद्रकेतू–( आदरपूर्वक ) स्वारीची तब्यत ठीक आहेना? फार दिवसांनीं पायधूळ झाडलीत हें माझें मोठें भाग्यच समजायचें.

सत्यविजय–यांत भाग्य कसलें. आपण मुळचेच भाग्यशाली समजायचें.

चंद्रकेतू–( विश्वसेनाला नेत्रसंकेतानें हार, तुरे देण्याविषयीं सांगतो. ) आपल्यासारखे जामात मिळाल्यावर मग कोणत्या गोष्टीची न्यूनता आहे ? सांगू

नये, पण सांगतोंच. आपल्या वडिलांकडून कांहीं दिवसांमागें मला पत्र आलें होतें. त्यांतील मजकूर पाहून आमच्या तोंडचें तर पाणीच पळालें होतें. हें वर्तमान ऐकल्यापासून खुद्द आपल्या गृहिणीनें तर आजपर्यंत अन्नपाणीही विशेषसें घेतलें नाहीं. असलाच त्या. पतीवाचून अशा वयामध्यें तिला दुसरें कोणतें बरें सुख ? आपण अगत्यपूर्वक आल्यानें आजपासून तिच्या दुःखाला ओहटी लागली असें ह्मणण्यास काय हरकत आहे ? ( मनोरमेला येण्याविषयीं विश्वसेनाला सुचवितो. )

सत्यविजय–( आपल्याशीं ) माझ्यासाठीं तुझ्या कारटीनें थोडकेंच अन्नपाणी वर्ज्य केलें असेल ! तो विश्वास कबूल झाला असता, ह्मणजे चांगली ह्मशी सारखी फुगली असती ! विश्वासावर तिचा विश्वास होता, पण त्यानें अविश्वास केल्यामुळें अखेर कारटीच्या कुभांडावरून सारसार विचार न करणारे, "पूच्छविषाणहीन पशू" तें हेच. आतां अपराधानें माप शीग लावून पदरांत टाकून पुढील मार्ग धरला पाहिजे.

( इतक्यांत मनोरमा पंचारती घेऊन येते. )

चंद्रकेतू–अग लाजतेस काय ! ओंवाळ त्यांना पंचारती.

सत्यविजय–( आपल्याशीं ) थांब. लौकरच तुझ्या रंगाचा बेरंग करून टाकतों.

मनोरमा-( सत्यविजयाच्या कपाळाला अक्षदा लावून, पंचारती ओंवाळू लागते, तोंच सत्यविजय एकीकडे तोंड करतो.

चंद्रकेतू-हें काय महाराज, अशा मंगलकालीं लाजणें चांगलें नव्हे. दोघेहीं आपलीं भिडस्तच. ओंवाळून मनोरमे. माझ्याकडे काय पहातेस? ( फिरून सत्यविजय एकीकडे उठून जातो. )

चंद्रकेतू-( आश्चर्यानें ) असें काय करावें वेड्यासारखें? किती दिवसांनीं भेटीची कपिलाषष्टी आली, आणखी आपण तिचा धिःकर करतां हें काय?

सत्यविजय-( संतापानें लाल होऊन ) काय ह्मणता धिःकार कां करता? धिःकार नाहीं; पण यावेळीं तुमच्या कारटीचें तोंड देखील पहाणें नको.

चंद्रकेतू-तें कां? दुसरी मिळाली ह्मणून पहिली नकोशी झाली अँ?

सत्यविजय-नावडतीहून नावडती. हिच्यापायीं आपण कांहीं दिवसापूर्वीं एखादा नरबली देण्याला उद्युक्त झालां होतां कीं नाहीं? बोला. गुप्त ठेऊं नका? उजेडांत आल्यावांचून राहणार नाहीं.

चंद्रकेतू-( विचारकरून ) मग त्या गोष्टीचा या गोष्टीशीं काय संबंध आहे?

सत्यविजय-संबंधानें संबंध जुळतो समजलात? तुह्मीं नरहत्या करण्याला उद्युक्त झाला होता कीं नाहीं?

चंद्रकेतू—महान अपराध्याला याच्याहून भयंकर शिक्षा दिली असती, तरी योग्यच झाली असती. त्यावेळच्या गोष्टीचें स्मरण झालें कीं, फिरून कोपाग्नि भडकून जातो.

सत्यविजय—मीही पण त्यावर तूप ओततों. या गोष्टीचा आपण सारासार विचार केला होताका ?

चंद्रकेतू—हो हो, विचाराखेरीज हें मी केलें असें आपण ह्मणतां कीं काय ?

सत्यविजय—केवळ अविचार ! पहा आतां इतक्यांत तुमच्या कन्येची व तुमच्या लौकिकाची राळ उडवून न देईन तर नांवाचा सत्यविजयच नव्हे.

चंद्रकेतू—( चपापून आपल्याशीं ) हें आहे तरी काय ? इतकें जेव्हां हा दरडावून विचारीत आहे, तेव्हां कांहीं तरी जबरदस्त इंगित यांना कळलें असावें. ही गोष्ट फार वाईट झाली ! ( उघड ) सत्यविजय महाराज, पहा उगीच असा वाद्-विवाद् नको. झाल्या गोष्टी होऊन गेल्या, आतां काय त्याचें. ही गृहिणी संभाळा आणि सुखानें कालक्रमण करा. ( मनोरमेला सत्यविजयापाशीं जाण्याला सांगतो. )

मनोरमा—( हात जोडून ) महाराज, दीन अबला गृहिणीला आणखी किती दिवस तरी दुःख द्यावयाचें.

सत्यविजय—( रागानें ) कुलकलंके, तुझ्या पातकाबद्दल

यमधर्माला नवा नर्क निर्माण करावा लागणार ! इतकी तूं पातकी आहेस कीं नाहीं, अशाबद्दल मी स्वतः आपल्या मनाची खात्री करून घेऊन बोलत आहें ?

मनोरमा—स्वप्नांतली नाहींना हकीकत ?

सत्यविजय—कुलटे स्वप्नांतली नव्हे दृष्टांतांतली. उगीच आतां कुलस्त्रियेची ऐट मला कशाला दाखवितेस ? म्हणे गृहिणी !

मनोरमा—नव्हे कां मी गृहिणी ?

सत्यविजय—

पद. ( सुखोपभोगा० या चालीवर. )

गृहिणी नससी अससि स्वैरिणी कुलटे कपट-
खनी ॥ प्राणावरती उलटुनि पडलिस
अघटित तव करणी ॥ पुरे पुरे तव संगत
आतां विटलों मी स्वमनीं ॥ उभय कुलांला
डाग लाविला अक्षय तूं सुजनीं ॥ १ ॥

पद. ( मैका छांड दे० या चालीवर. )

कर कृष्णवदन झडकरि तूं कुलटे तुजसम
जनीं जारिणी नच कोणी ॥ कर० ॥ १ ॥

मनोरमा—

पद. ( भैरवी, मेरा होष गया० या चालीवर. )

स्वपतिविना नच शांति जिवा नच चैन प्रिया
किमपी स्वमनीं ॥ विफल तुह्मांविण जन्म
खरा जगिं या सखया नच सौख्य मनीं ॥

सत्यविजय—

वरती जितकें लख लख दिसतें ॥ तितकें अंतरीं निर्मल नसतें ॥ पतिसुख तुज नच इथुन पुढती ॥ कर० ॥ १ ॥

मनोरमा—

गगनिं जरी विलसे न शशी कशि रम्य दिसे मग ही रजनी ॥ सुमनमधू मधुपासचि हा करि शांत प्रियावचनीं ह्मणुनी ॥ नच कोप करा मम आस पुरी मन शुद्ध करा स्वकरीं धरुनी ॥

सत्यविजय—

उगवे अस्ताचलिं वासरमणी ॥ समजे स्वस्थानातें सोडुनी ॥ वच तव मज द्रव न कांधिं आणिती ॥ कर० ॥ १ ॥

पूर्वी तूं विश्वास या नांवाच्या शागीर्दावर लुब्ध झाली होतीस कीं नाहीं? बोल. खरें सांगशील तर कांहीं तरी दया करीन.

मनोरमा—( लाजून हळूच ) त्याच्या व आपल्या चेहऱ्यांत, कृतींत, बोलण्यांत साम्य दिसत होतं ह्मणून मी—

सत्यविजय—थांबू नकोस. मजसारखा तसाच एखादा दुसरा पुरुष आढळेल, तर खुशाल मी तुला सोड-

चिठ्ठी देतों. खरेंच सांगतों, स्त्रीचारित्र दाखवूं नकोस. विश्वास तो मीच. मग माझ्यावर तूं आषक झाली होतीस कीं नाहीं, ह्याची परीक्षा मी केली. मग सांग तर आवडता कोण तो? चतुर असतीस, तर केव्हांच मला ओळखला असतास! कसोटीशिवाय परीक्षा होत नाहीं. ( सर्व चकित होतात. )

मनोरमा—

पद. ( काठेवाडी रासियाचे चालीवर. )

**पदरीं घ्या तुह्मीं अबला ॥ विनती श्रवण करुनि मबला ॥ अजुनी दया कशि नये प्रिया ॥ चरणीं ठाव द्या मजला ॥ १ ॥**

महाराज, मी सर्वापराधी आहें! क्षमा करा! असं जर न होईल तर, सौभाग्यपणीं प्राणनाश करून देहाचं सार्थक करून घेतें. काळा या कुलकलंकीला घे आतां आपल्या जबड्यांत. ( मनोरमा प्राणनाश करून घेण्याकरितां धांवते तोंच चंद्रकेतू तिला आंवरून धरितो. )

चंद्रकेतू—सत्यविजय महाराज, सर्व अन्याय पोटीं घालून दासीप्रमाणें कां होईना, पण हिचा स्वीकार केल्यानें जगांत अपकीर्त्ति न होतां, कीर्तिंच होईल; विचार करा. आपल्या ठिकाणीं तिचें मन तन्मय झालें होतें, पण भ्रांतीनें तिच्याकडून चूक झाली. क्षम्य

नाहीं हें खरें, पण परपुरुषाला तिनें स्पर्श केला नाहीं. आतां सर्व राग गिळून तिच्या अन्यायाला क्षमेची शिक्षा करा. आपण धन्य आहात ! रक्ताचा संबंध तोडूं नये, एवढीच करद्वय जोडून भिक्षा मागतों.

सत्यविजय—तर मग मी सांगतों तें तिनें केलें पाहिजे.

चंद्रकेतु—मनोरमे, ऐक काय सांगतात तें.

सत्यविजय—

साकी.

**कुलस्त्रियेची करुनी सेवा राही सन्निध युवती ॥**
**नातरी करी कालक्रमणा तात सदनिं तूं कुमती ॥**
**होसिल जरि दासी ॥ ठेविन संतोषें तुजसी ॥ १ ॥**

मनोरमा—दासीला इतकें अभयवचन असल्यावर, पतिसेवा करून मी आपला कलंक खचित नाहींसा करीन. आणखी ह्यांची साम्यता पावेन. बाबा ! आजपासून आपलें घर मला वर्ज्य झालें. फक्त आशीर्वाद द्या. कलंक गेल्याखेरीज मला शुद्धता येणार नाहीं, आणि आपल्या घरीं येतां येणार नाहीं.

चंद्रकेतू—( गहिंवरून ) सत्यविजय महाराज, आपण सूज्ञ आहात, माझ्यानें जास्त बोलवत नाहीं, सांगायचें इतकेंच कीं, सर्वांच्या साक्षीनें पोटचा गोळा आपल्या पदरांत टाकला आहे ! थोडासा फळआहार करून मग प्रयाण करावें, असें शास्त्र आहे. विश्वसेन आटपा लौकर.

सत्यविजय—आतां माझा कोप शांत झाला. आपल्या आदरातिथ्याचा मी स्वीकार करणें हेंच योग्य आहे.

( सर्व जातात. )

## प्रवेश २ रा.

स्थळ—कांतीनगर सत्यविजयाच्या बहिणीचें घर.

विश्वप्रिय—अग ऐकलंसका ? इकडे ये पाहूं सत्यविजयांकडून मला आतांच पत्र आलें आहे. त्यांत ते लिहितात कीं, बरोबर फारच मोठा लवाजमा असल्या कारणानें या खेडेगांवीं त्यासह उतरण्याची सोय नसल्यामुळें, मी सध्या स्वारीनिशीं येऊन फक्त साखरपाणी घेऊन तडक कांतीपुराला जाणार ह्मणून आगाऊ सूचना दिली आहे. हँ, आटप लौकर. फराळाची वगैरे सर्व व्यवस्था ठेव. बाब्या, बैजा, इकडे या बागेंत जा आणि माळ्याकडून फुलें व कांहीं शिताफळें. केळीं, वगैरे फळफळावळ असेल, ती घेऊन या. ( बाब्या, बैजा व्हयजी साब असें ह्मणून जातात. ) अग इकडे ये पाहूं. ( सुशिला येते )

सुशिला— कां हाक मारणं झाऊं ?

विश्वप्रिय—कमजास्त कांहीं करूं नकोस. त्यांच्या आवडीचेच फक्त जिन्नस कर.

सुशिला—हें का मला सांगायला पाहिजे ? माझ्या अण्णारायाला साखरेचे पाकवलेले पोहे नि खुसखुशीत घोसाळ्याचीं भजीं आवडतात. काफी तयार आहेच. झालं, खेडेगांवचा इतका बेत असल्यावर मग आणखीं काय जास्त पाहिजे ? बाळ्याला न् बैजाला मळ्यांत पाठविलं ना ?

विश्वप्रिय—अग हो. ते आतां येतील.

सुशिला—जरासा अवकाश असता, तर मी माझ्या अण्णारायाच्या आवडीचे पदार्थ केले असते. मी आग्रह करण्यापेक्षां आपणच करा. ह्मणजे त्याला जास्त अगत्य दिसून येईल. मी जातें तर.

विश्वप्रिय—"पुरुषस्य भाग्यं" ही ह्मण अक्षरशः खरी आहे. असो, प्रेमानें अगत्यपूर्वक ते आमच्या खेड्याला विसरले नाहींत, यावरून त्यांच्या मनाचा मोठेपणा सहज दिसून येतो. ( इतक्यांत विश्वप्रियाचा स्नेही व बाळ्या, बैजा येतात. )

मित्रचंद्र—कां रावसाहेब, आज मध्येंचसा थाटमाट दिसतो ? मारे हार, फुलें, फळफळावळ वगैरेची एकच गर्दी उडवून दिली आहे तेव्हां हें आहे तरी काय ?

विश्वप्रिय—अहो, आज आमचे शालक इतक्यांत येणार आहेत, त्यांना नाहीं राहावयाला सवड, तेव्हां

आपला साधा फराळाचा बेत ठेवला आहे. खेडवळ बेत कां होईना, पण केला पाहिजेना ?

**मित्रचंद्र**—अहो, याच्यापेक्षां शहरांत जास्त तें काय असतें ? ( ऐकल्यासारखें करून ) हा गाडीचा धडधड शब्द ऐकूं येत आहे. यावरून स्वारी आलीशी वाटते.

( इतक्यांत सत्यविजय येतो. विश्वप्रिय व मित्राचंद्र सामोरे जातात आदरसत्कारपूर्वक बसतात. )

**विश्वप्रिय**—थोडेसें गडव्यांत पाणी पाठवून दे पाहूं !

( ब्राह्मण रुप्याच्या गडव्यांतून पाणी घेऊन येतो. )

**सत्यविजय**—( पाण्याचे गुळणे टाकून ) रावसाहेब तुमच्या गांवचें पाणी मात्र सगळ्या ठिकाणाहून उत्कृष्ट. असें पाणी आजपर्यंत एका ठिकाणीं देखील मला आढळलें नाहीं. तुह्मी मोठे भाग्यवान्.

**विश्वप्रिय**—कशाचे, कशाचे. अहो आपलें खेडवळ झालें. स्वारी अगत्यानें इकडे वाट चुकली हें आमचें मोठें भाग्यच समजायचें. याला ह्मणतात प्रेम. परस्पर गेला असतां, ह्मणजे आह्माला कशाला कळणार होते. बरं पण स्वारी आली कोणीकडून, मोठा लवाजमान् हें खटलं तरी आहे कसलें ?

**सत्यविजय**—फार फिरलों बोवा रावसाहेब. ईश्वर कृपेनें सर्व कांहीं मनाजोगें होऊन कृतकृत्य झालों. राजपद तें देखील मला मिळाल्यासारखें झालें.

**विश्वप्रिय**–( आश्चर्यानें ) वाहवा ! सत्यविजयराव. एकूण तुह्मी मात्र खरोखर जन्माचें सार्थक केलेंत, मित्रचंद्र घरांत जा. आणखीं फराळाची लौकर ताटें घेऊन या. सत्यविजयराव, अगदीं निर्लेप बेत ठेवला आहे. आगाऊ सूचनेप्रमाणें सर्व बेत ठेवला आहे. ( इतक्यांत मित्रचंद्र व सुशिला पात्रें वाढलेलीं घेऊन येतात. ) आज घरांतून आपल्या आवडीचेच पदार्थांची तयारी झाली आहे. हँ, आटपा लौकर ( सर्व पात्रांवर बसतात. )

**सुशिला**–अण्णाराया, जरी जाण्याची घाई असली, तरी स्वस्थपणानें फराळ कर. मी केलें इतकं खाल्लं पाहिजेस.

**सत्यविजय**–( आपल्याशीं ) मला जें पाहिजे तें यांत कोठें दिसत नाहीं. थांब आतां रावसाहेबांच्या देखत तुझी फजितीच फजिती उडवून टाकतों गरम खिसा पाहिल्याबरोबर कशी लाडी गोडी लावायाला लागली पहा. आतां जराशी गम्मतच केली पाहिजे. ( पानाकडे पहात स्तब्ध बसतो. )

**सुशिला**–अण्णा अरे अण्णा. असा भ्रमिष्टासारखा स्वस्थ पानावर हात जोडून काय बसलास ? खायचं नाहींका ? आपण तरी जरा सांगा. उगीच सर्वच कसे स्तब्ध बसलांत ?

**विश्वप्रिय**–सत्यविजयराव, असे स्तब्ध कां ? चालूं द्या

सत्यविजय–रावसाहेब, माझ्या आवडीचा पदार्थ यांत मला दिसत नाहीं, ह्मणून उगीच बसलों.

विश्वप्रिय–मोठे आवडीचे पदार्थ ते हेच कां ? हेंद्रं कुठचं. बायका आचरट ह्मणतात तें कांहीं खोटं नव्हे.

सत्यविजय–ताई, माझ्या आवडीचे पदार्थ तुझ्या हातचे खावेत, ह्मणून मी मुद्दाम रस्ता चुकवून इकडे आलों, हें कांहीं मला आवडत नाहीं.

सुशिला–तर मग सांग काय आवडतं तें आतां करून आणत्ये. ( जाऊं लागते. )

सत्यविजय–ताई, मुद्दाम नको करूं. माझा आवडीचा पदार्थ मला माहीत असून तो मी मुद्दाम ठेवला आहे. अगोदर घेऊन येतों. ( जातो. व पूर्वी आल्यावेळीं जमिनींत पुरून ठेवलेली अंबाड्याची भाजी व भाकरी बांधलेली घेऊन येतो. ) रावसाहेब, हा माझ्या आवडीचा पदार्थ. हें मी खातों, आणि आपण तें खा ह्मणजे झालें; ज्या वेळीं मी कंगाल स्थितींत येथें आलों होतों, त्यावेळीं आपल्या कुटुंबानें ह्मणजे माझ्या भगिनीनें, माझा गोड गोड शब्दांनीं मोठा आदरसत्कार करून हा पदार्थ गंगीकडून देववून माझी परस्पर रवानगी केली होती, तेव्हां अशा धनलोभी भगिनीची आपल्या समक्ष शोभा करून तिला लुगडें चोळी देऊन फक्त आपल्या-

सारख्या सुशील मूर्तीचें दर्शन घेऊन मग जावें, ह्मणून हेलपाटा घेऊन आलों.

**विश्वप्रिय**—नाक चिरून चांगलें मीठ भरलें. 'चांभाराच्या देवाला खेटराचीच पूजा' तरी मी त्यावेळीं सांगितलेलें मला पक्कें आठवतें. 'कीं मामाकडून पत्र आलें आहे, त्यांनीं जरी कांहीं लिहिलें, तरी आपण त्यांचा परामर्ष घेतला पाहिजे.' असें असून जाति-स्वभावावर जाऊन मला नकळत परस्पर कारभार करून अक्षयचा फजितवाडा करून घेऊन उलट माझी अब्रू घालविलीस, हीचका अक्कल? जा तोंड काळें कर.

(सुशिला फजीत होऊन जाते. थोडासा सर्वजण फराळ करितात. पानसुपारी व अत्तर गुलाब झाल्यावर.)

**विश्वप्रिय**—सत्यविजयराव, आपल्या अपमानाबद्दल मला क्षमा करा व आहे तसाच लोभ वृद्धिंगत करा हीच विनंती आहे.

**सत्यविजय**—रावसाहेब, आपल्याकडे काडीइतका देखील दोष नाहीं. फक्त तिची आपली गम्मत आपल्याला दाखविली.

**मित्रचंद्र**— वहिनी, आतां क्षमा मागा आणखी वरवर प्रेम न ठेवितां अंतःकरणापासून ठेवा.

**सुशिला**—( लाजून हळून ) आण्णाराया मला क्षमा कर. माझ्या चुकीचा दंड तूं पूर्णपणें दिलास. तूं तरी मला विसरूं नकोस, ह्मणजे झालें.

सत्यविजय—ताई, माझ्या मनांत ईश्वरसाक्ष कांहीं नाहीं बरें,

बाळ्या व बैजा—( आपसांत ) मर्दा बैजा अर लई दिस झाले हिरीवर आपल्याबरावर झुनका भाकरी खाल्लं ह्येच र गिरस्थ, संशय नग. सबुद्‌तर अक्शी त्योच.

बैजा—अर लइ दिस झाल ह्मनून वळख विसरलका ?

सत्यविजय—( बाळ्या व बैजाकडे निरखून पाहून ) हेच ते माझे परममित्र. बाबानों, हें घ्या तुह्माला इनाम मला अवकाश नाहीं ह्मणून देतों हे घ्या तुमचे उपकार मी विसरणार नाहीं. रावसाहेब ह्या उभयतांना व आणखी एक तिसरा. कायरे त्याचें नांव ?

बाळ्या—त्येच नाव भैन्या राव लया दिसांनीं गाठ पडली अन् तवा न्हाई आमासनी सांगितल.

सत्यविजय—ह्या तिघां इसमांना पत्र पाठवीन त्यावेळेस तावडतोब पाठवून द्या. हे जातीचे कुणबी असून इतके कांहीं प्रेमी व समंजस आहेत कीं, ह्यांचें मी वर्णन करूं शकत नाहीं. मी ह्यांचा फार ऋणी आहे.

बाळ्या व बैजा—ह्येला ह्मनत्यात सतइजय. मन कस गंगवानी.

सत्यविजय—रावसाहेब, आतां सर्वजण कांती नगराला जाऊंया.

( सर्व निघून जातात. )

=======

# प्रवेश ३ रा.

## सत्यविजयाचें घर.

(सत्यविजयाची माता पुत्रशोकानें फारच आजारी झालेली आहे व जवळ धनमित्र व दिवाणजी बसलेले आहेत अशीं दृष्टीस पडतात.)

धनमित्र—अग, मघाच्या मात्रेनें तुला अमळ बरें वाटतें कां?

लक्ष्मी—(कण्हत) पुत्रभेटीच्या मात्रेवांचून दुसऱ्या मात्रांचा काय बरें उपयोग ! उगीच औषधापायीं कशाला पैसे खर्च करतां? तो येईल तर नेत्रभर पाहून घेऊन खुशाल वैकुंठाच्या यात्रेला जाईन. (वायूच्या झटक्यानें) बाळा सत्यविजया ! मला नाहींना भेटणार? आशा ठेवून मरून जाऊं ह्मणतोस? मरतेसमयीं तुझ्यावांचून माझ्या मुखांत कोणरे पाणी घालील? बाळा सत्य—(जीभ आडवी पडते.)

धनमित्र—(घाबरून) दिवाणजी आजपर्यंत झालेला खर्च व मेहनत फुकट जाणारशी दिसते. पुत्रभेटीची आशा कधीं तृप्त होणार नकळे. नाहींपेक्षां असें जर न घडलें, तर सर्व द्रव्यावर लाथ मारून मला संन्यास घ्यावा लागणार असें दिसतें. आतां पश्चात्ताप होतो पण उपयोग काय? सत्यविजय असतां, ह्मणजे मला पैशाची कांहीं काळजी नसती. अग

असें वेड्यासारखें बरळूं नये, नशीबवान् असशील तर पुत्रभेटही होईल. पण मनाला उतावीळ होऊं देऊं नकोस. तें कबजांतून गेल्यावर मग औषधपाणी तरी काय करणार ? दिवाणजी ती कांजी इकडे द्या पाहूं. पित्तानें तिचें मस्तक हलकें होऊन प्राण कासावीस झाला आहे. तेव्हां दोन चमचे कांजी घेतली तर पाहूंया; इलाजकरून पहावा. पुत्रामुळें अपकीर्तीला तर पात्र झालोंच आहे. त्यावर हें दुसरें अपयशाचें खापर मस्तकीं फुटल्यावर मग जगांत तोंड न दाखवितां काशीचा रस्ता धरावा लागणार ! ( कांजी घालूं लागतो. )

लक्ष्मी–( कांजी थुंकून टाकते ) बाळा मला यमदूत दिसूं लागलेरे ! अजून तरी भेट दे. नाहीं देत ? जाऊं तर मी.

( इतक्यांत घाईघाईनें देवडीवरील शिपाई येतो. )

शिपाई–दादासाब, लई आनंदाचे वर्तमान सांगन्यासाठीं आलूया. आपलं अन्नासाब मेन्यांत बसूनशान् आल्याती. वरदी कळवाया त्यांनीं मला सांगितलय.

धनमित्र–काय ह्मणतोस, माझा सत्यविजय आला आहे ? दिवाणजी मी इच्याजवळ असतों. तुह्मी त्याला घेऊन या. मी त्याला हें कृष्णवदन कसें दाखवूं ! ( दिवाणजी जातो ) एकाएकीं हिला हें वर्तमान

कळविल्यानें आनंदवायु होईल, यासाठीं वेळ पाहू-
नच हें हिला सांगावें.

( दिवाणजी, सत्यविजय, त्याच्या दोन्ही बायका व परिचारक प्रवेश करितात )

सत्यविजय—बाबासाहेब, हा बालक वंदन करीत आहे.

( दोन्ही बायका धनमित्राला नमस्कार करितात तो तिघांना आशीर्वाद देतो. )

धनमित्र—( आश्चर्य भरीत होऊन ) बाळा तुझ्या ते-
जानें माझे डोळे दिपतातरे ! ही दुसरी कोण ?

दिवाणजी—दादासाहेब हें आण्णासाहेबांचें दुसरें कुटुंब ?
आपले चिरंजीव नृपजामात झाले बरें; वडिलांच्या
पोटीं येऊन उभयकुळांचा उद्धार केला बरें.

धनमित्र—माझ्या पोटीं आल्याचें सार्थक झालें ?

सत्यविजय—दिवाणजी, आई कोठें दिसत नाहीं देवा-
ला गेली आहे का ? सांगा अगोदर, तिच्यावांचून हें
जग मला शून्यवत् दिसत आहे.

दिवाणजी—आण्णासाहेब, आईसाहेब आपल्या वियोग-
दुःखानें विव्हल होऊन अंथरूण धरून आहेत !
त्या पहा.

सत्यविजय—( घाबरून ) शिव शिव ! देवा ! काय हि-
ची ही अवस्था ! आई ! आईग पहा. नेत्र कां मिटले !
मी कोण आहें ओळखलेंस का ? सावध हो सावध

हो. ( दोघी घाबऱ्या होऊन आपआपसांत नेत्र संकेत करितात. )

लक्ष्मी—बाळा, मी निराश होत चाललें ! माझा प्राण घुटमळूं लागलारे ! अखेरची तरी भेट देरे ! तूं देखील निष्ठुर कसारे झालास ! यमदूतांनों, एकदम झडप नका घालूं अँ. पुत्रभेटीचें स्वप्न तरी मला पाहूं दे !

सत्यविजय—( विव्हल होऊन ) माते ! ज्याच्या भेटीची इच्छा धरली आहेस, तो हा अभागी सत्यविजय सन्निध असतां भलभलतें काय बरळतेस ?

पद. ( राग—भैरवी, ताल—दादरा. )

नयानें प्राण ठेविलास जननि तूं कसा ॥ वद-नावरी स्पष्ट दिसे भ्रांतिचा ठसा ॥ धृ० ॥ कुलदेवी सेवूदे वचन मधुरसा ॥ शांत करी चैन नसे तप्त मानसा ॥ वृत्ति तुझी पाहुनि ये हृदयिं साध्वसा ॥ मातेगे धीर पहा धरूं तरी कसा ॥ १ ॥

पद. ( राग—भैरवी, ताल—धुमाळी. )

आजवरी मजसाठीं जननी दुःख तुला बहु झालें ॥ मच्चिंतेनें निशिदिनिं तुजला आति-शयगे छळिलें ॥ धृ० ॥ तव प्रसादें महत् संकटीं तारुनि वांचविलें ॥ उपकृती तव फेडूं

कैशी स्थल कोठें नुरलें ॥ कृपावलोकनें
पाही जननी तनया तूं पहिलें ॥ १ ॥

लक्ष्मी--पाहिला बरें, डोळे भरून पाहिला. जन्माचें सार्थक झालें. माझी मनोरमा, सुशिला जवळ असत्यां ह्मणजे त्यांनीं माझी ओटी भरली असती !

मनोरमा--( शोकानें ) सासूबाई मुलींकडे पहा. असें करूं नका. आपल्यावांचून आमचें कोण बरें संगोपन करणार ?

राजकन्या--( मनोरमेबरोबर दुःखीत होते. )

धनमित्र--मुलींनों, उगीच दुःख करूं नका ! तुमच्या शोकानें ती जास्त घाबरेल ! सर्व दुःख गिळून टाका. उगी राहा बरें मुलींनों !

सत्यविजय--माते ! तूं सावध होत नाहींसना ? हें पहा तूं जर याउपर दुःख न विसरून परलोकचा रस्ता धरलास, तर तुझ्यावांचून मला तरी काय करायचें आहे, या संसाराला आणि राज्याला. तूं जर माझें वैभव न पाहशील तर—

पद. ( राग—बिभास, ताल—दादरा. )

सर्वसंग परित्याग करुनि तत्वता ॥ वैराग्या
स्वीकरितों सत्वरी अतां ॥ धृ० ॥ मातेविण
शून्यदिसे भुवन प्रियसुता ॥ योगतपावीण
नये स्वमनि शांतता ॥ दिनरजनीं हृदयिं
वसो मातृदेवता ॥ १ ॥

( आंगावरील पोषाख उतरून वैराग्याची तयारी करितो. )

**दोघी स्त्रिया**–( शोकानें ) प्रिया ! आपण जर असें करूं लागलांत, तर या दीन अबलांनीं कोणाकडे पाहून दिवस काढावेत ! आह्मींही आपल्या बरोबर जोगिणी होणार. ( त्याही आपल्या आंगावरील अलंकार काढूं लागतात. )

**दिवाण**–दादासाहेब, आपण तरी ह्यांची समजूत करा. हा पोरखेळ काय उपयोगाचा.

**धनमित्र**–( विव्हल होऊन ) दिवाणजी माझ्या तोंडां तून एकही शब्द निघत नाहीं. अनुतापाग्नीनें मी अगदीं करपून चाललोंहो !

**दिवाणजी**–अण्णासाहेब, आपण सर्व जाणते असून असा अविवेक काय ह्मणून करता ? आपण जरासा मनाला आंवर घाला. पहा ह्या मुलींचें जीवित्व सर्वस्वी आपल्यावर अवलंबून आहेना ?

**सत्यविजय**–दिवाणजी आतां कशाचा मनाला आंवर घालूं ! हें ब्रह्मांड दुःखाग्नीनें भडकून गेलें आहे. ( इतक्यांत योगीराज दोहरा ह्मणत ह्मणत येतात तो ऐकल्यासारखें करून ) अहाहा ! संतमहाराजांची अमृतवाणी ऐकूं आली. गुरुमहाराज, या दीनदासा-ला भवसिंधूंतून पार करण्याला आपल्यावांचून दुसरा कोणी नाहीं. ( योगी प्रवेश करितो. )

योगी–( सर्वांची स्थिति पाहून ) अरे, या मोहजालांत सर्व कसे गुरफडून गेले आहेत पहा, प्रियदासा सावधहो, सावधहो, काय प्रकार मांडला आहेस हा?

सत्यविजय–( पूर्व स्थितीवर येऊन व योग्याला वंदन करून ) भो गुरुवर्य या दासाला आतां मायाजालांतून मुक्त करा. आतां या संसाराला विटलों. जिच्या प्रसादानें आपले चरण या हतभाग्याला पुनरपि दृष्टीस पडले, त्या मातृदेवतेवांचून मला संसारयात्रा करून काय करायचें? मला दीक्षेची भिक्षा द्याला ह्मणजे झालें.

योगी–( गंभीरपणानें ) बेटा, असा अविचार करूं नकोस. अद्याप तुझी कीर्ति दिगंतरीं दुमदुमावयाची आहे, असें असून वैराग्य कशाला स्वीकारतोस? ( मातेच्या आंगावरून हात फिरवून )—

साकी.

कमंडलूतिल जल सिंचोनी, सावध करितों आतां ॥
तव मातेला, मत्प्रियदासा, न करी किमपी चिंता ॥
अविवेका न करी ॥ स्वमनीं शांती नित्य घरी ॥१॥

( सत्यविजयाच्या मातेच्या आंगावर जलसिंचन करितो. )

पहा, एका क्षणांत तुझें मातृदैवत सावध होईल, तिचा मृत्यु ईशकृपेनें टळला. ( माता कांहीं वेळानें सावध होते. )

सत्यविजय—अहाहा ! योगिराज, या दासावर केवढी आपली कृपा ! धन्य धन्य मी मोठा भाग्याचा ह्मणून मला दर्शन दिलेंत.

योगी—बेटा, ज्यानें माझ्या उपदेशाची किम्मत केली, तो मला प्राणाहून प्रिय आहे. तूं महत्संकटांतून पार पडल्यानंतर मध्यंतरीं अरण्यांत तुला दर्शन देऊन प्रसाद दिला होता, तो मीच. तूं मला सव्वा लाखाच्या मोहरा दिल्यापासून मी सदोदीत तुझा पाठिराखा होतों बरें ! माझ्या उपदेशाचा तूं पूर्णपणें अनुभव घेऊन चुकलास, ह्मणून मी देखील कृतकृत्य झालों. ह्या घे तुझ्या सव्वा लाखाच्या मोहरा. ( मोहरा देतो ) आह्मा योग्यांना या वमनतुल्य द्रव्याचा काय बरें उपयोग ? आतां ज्यापक्षीं तूं दान केल्या आहेस, त्यापक्षीं ह्या द्रव्याचा धर्माकडे उपयोग कर ह्मणजे झालें.

सत्यविजय—( सद्गदित होऊन )—

पद. ( राग-ललत, ताल त्रिताल. )

तव बोधसुधा प्राशूनी ॥ सन्मार्गाचा शोध लागला ॥ संतसमागम घडला ह्मणुनी ॥ धृ० ॥ भाग्यरवीचा उदय होउनी ॥ कृपावलोकन झालें ह्मणुनी ॥ तव भेटीची कपिलाषष्ठी ॥ ईशदयेनें घडली सुजनीं ॥ १ ॥

योगी—बेटा—

पद

धर्म-अर्थ काम-मोक्ष चार साधुनी ॥ कृतार्थ
जाहलासि तूं खरा जनीं ॥ धृ० ॥ ईशनाम
गात जा मुखें निशीदिनीं ॥ संतसंगती असे
दुरितनाशिनी ॥ १ ॥

धनमित्र—गुरुमहाराज, तुमच्या दर्शनानें मी पूनित झालों. बाळा सत्यविजया—

पद

धन्य धन्य तूं असती सखया ॥ नांवापरि
तूं करणी करुनी गाजविलेंसी जगतीं विज ॥
या ॥ धृ० ॥ कुलदीपक तूं जन्मा येउनी ॥
कृतार्थ मजला केलें सुजनीं ॥ म्हणुनी आशा
नुरली स्वमनीं ॥ शतायुषी हो घे आशिर्वच
सदा असे तुजवर ईशदया ॥ १ ॥

योगिराज, ज्या धनलोभानें मी आपल्या दासाला दुःखविलें, त्या द्रव्यावर आपल्या समक्ष उदक सोडून मी आतां जन्मसार्थकतेकरितां तपानुष्ठानाला जातों. बाळा, सत्यविजया ईशकृपेनें तुला राज्यपद मिळालें, यासाठीं सर्व द्रव्याचा विनियोग धर्माकडे खर्च कर, म्हणजे मी कृतकृत्य होईन.

सत्यविजय—बाबासाहेब, आपल्याला उपरति झाली,

हीच तपाहून जास्त आहे. ( आई सावध होते. )

**लक्ष्मी**—बाळा येरे मला कडकडून भेट. ( उठूं लागते. )

**सत्यविजय**—आई तूं उगीच श्रम करूं नकोस. मीच तुला भेटतों. ( वंदन करून भेटतो दोघी सुना वंदन करितात, ' सर्वांना ' ती आशीर्वाद देते. )

**लक्ष्मी**—योगीमहाराज, या दासीवर कृपानुग्रह असावा. मी वंदन करितें ( दोघी सुना योग्याला वंदन करितात. )

**योगी**—बेटा, ईशकृपेनें तुझे सर्व मनोरथ परिपूर्ण झाले. आतां आणखी कांहीं इच्छा असेल तर माग.

**सत्यविजय**—( हात जोडून ) महाराज, सर्व इच्छा परिपूर्ण झाल्या, पण माझ्या सर्व देशबांधवांसाठीं मागतों एवढें द्या म्हणजे झालें.

पद. ( राग—भैरवी, ताल—दादरा. )

**भरतभूमिमाजि सदा ऐक्यता वसो ॥ कल-**
**हाचा कोणासी गंध मुळिं नसो ॥ धृ० ॥**
**सकल जनीं शांतीचा वास तो असो ॥ संत-**
**बोध भगिनिबंधु मानिं सदा ठसो ॥ घन-**
**धान्यें समृद्धि सकल गृहिं असो ॥ १ ॥**

**योगी**—( वरदहस्त करून ) तथास्तु, तथास्तु, तथास्तु.

( पडदा पडतो. )



# भरतवाक्य.

पद. ( ब्यांडच्या चालीवर. )

त्रिभुवननाथा हे मत्ताता ॥ शांति न चित्ता किंमपी या ॥ दर्शन तव हें दुर्लभ झालें आसरा न दासा या ॥ चाल ॥ विश्वव्यापका। सौख्यदायका । तुझ्या मनीं बहू । दया वसे हरी । षड्रिपू पहा । गांजती मला । देई दर्शना । सत्वरी हरी । जन्म नको । फिरुन मला । दुरित नाशना । पतित पावना । नाहिं वासना । अन्य या मना । श्रीनिवास । दर्शनास माधवास । घेऊं दे । त्रिभुवननाथा ॥ १ ॥

( सर्व पात्रें जातात. )

समाप्त.